अंतसमय नजीक आला तेव्हां वडिलांनीं, "शिवोऽहं, शिवोऽहं" असें म्हणण्यास सांगतांच "छे! छे! उगीच खोटं कशाला बोलायचं?" असें बेशुद्धिवस्थेंत ताडकन् बोलून आपल्या स्पष्टवक्तेपणाचा प्रत्यय जिनें अत्यंत करुणास्पद अवस्थेंत आणून दिला, जिच्या कृश पण तेजस्वी, फटकळ पण प्रेमळ, करड्या पण स्निग्ध व्यक्तित्वाचा, दिनांक ३ मे, १९४५ रोजीं अंत झाला त्या सौ. कमलाबाई (कमी) गणेश जोशी हिस—

वसंत गोविंद देशमुख

# बाबा, मी नोकरी करणार !



[ छापखान्यांतील यंत्रांची धडधड ! माणसांची — आंत काम करणाऱ्या माणसांची — धावपळ. आपल्या इकडील कोठल्याही छापखान्यांत — विशेषतः वृत्तपत्रीय छापखान्यांत — दिसणारा गबाळपणा. 'तरुण' दैनिकाच्या धडाकेबाज संपादकाची काचेच्या आणि लाकडी फळयांच्या दिलजमाईनें बनलेली खोली. संपादकीय खात्यांत एक पन्नाशीच्या घरांत असलेली व्यक्ति डोळे फाडून वाचीत असतांना दिसते. बाजूला एक लेंगेबाज तरुण मोठ्या कष्टानें, कांहींतरी 'टाइप' करण्याचा प्रयत्न करीत आहे. त्याच्या बाजूला असलेल्या बाकड्यावर 'कोंडिबा' 'तरुण'चा खास चोपदार, मोठ्या झोकांत विडीच्या धुराचे लोट सोडीत बसला आहे. बंदिस्त खोलींतून घंटीचा आवाज — पुन्हा तडाखेबाज आवाज आणि लगेच, 'कोंडिबा, कोंडिबाऽऽऽ ए कोंड्याऽऽऽऽऽ' अशी गर्जना. ]

**कोंडिबा :** [ विडीचा जास्तींत जास्त झुरका घेत ] आलों, आलों ऽऽऽ

**मनोहर :** कोंडिबा, तुला शेवटचं सांगून ठेवतों. वृत्तपत्राची कचेरी म्हणजे नाक्यावरचं पानतंबाखूचं दुकान नव्हे. जर इथें विडी ओढतांना कधीं पुन्हा पाह्यला तर महिन्याचा पगार एकदम देऊन टाकीन विड्या ओढायला तुला, समजलास ! जा; एक कॅप्स्टन् घेऊन ये पाहूं. लवकर ये हं.

**कोंडिबा :** चुकलों धनी, माफ करा हं. आत्तां आनतो. 'कॅप्तान्' नव्हं का !

**मनोहर :** टाळके, मिस्टर टाळके, आंत या पाहूं.

**टाळके :** काय हुकूम आहे ?

**मनोहर :** तुमचं टाळकं ठिकाणावर आहे का ?

**टाळके :** [डोक्याला हात लावीत] आहे, हो आहे ना. ठिकाणावर आहे माझं टाळकं !

**मनोहर :** तसं नव्हे. डोकं हा अवयव गाढवाला देखील असतो. प्रुफं तपासतांना तुम्ही हल्लीं किती भयंकर चुका करतां आहांत माहीत आहे तुम्हांला ?

**टाळके :** नाहीं, खरंच नाहीं !

**मनोहर :** नाहीं ना ? नसायचंच. चुका आहेत हें माहीत असून सुद्धा तुम्हीं त्या मुद्दाम ठेवल्या असल्यात तर डोक्याचा अवयव असल्याचं श्रेय देखील तुम्हांला मिळूं दिलं नसतं मीं. तें कांहीं नाहीं, 'पाहिजेत' कॉलम्मध्यें जाहिरात द्या. घ्या लिहून.

**कोंडिबा :** [लगबगीनें आंत शिरत] घ्या धनी शिग्रेट !

**मनोहर :** गुड्, स्मार्ट फेलो. जा, तूं देखील ओढ एक विडी बाकावर. पण फक्त एकदाच हं !

**कोंडिबा :** [हर्षातिशयानें] व्हय् जी.

**मनोहर :** हं ! 'एक हुषार, चाणाक्ष, वाङ्मयाची आवड असणारा, कामाचा कंटाळा न करणारा तरुण पाहिजे. पगार लायकीप्रमाणें. स्त्रीवर्गाची उन्नति करणें हें देखील आमचें धोरण असल्यामुळें तरुणींच्या अर्जांचाही सहानुभूतीनें विचार केला जाईल.' बस् ! एवढंच. उद्यां छापून आली पाहिजे हं !

**टाळके :** त्याची नको काळजी.

* * * *

[सानपूरच्या वैजनाथ सुगंध्यांकडे 'तरुण' रोज पडत असतो. वैजनाथांच्या घरीं महिला बऱ्याच असल्यामुळें ह्या अंकाला विशेष भाव असे. वैजनाथ – मनुष्य साधा आणि देवभोळा, सुखवस्तु आणि म्हणून प्रेमळ. सात्त्विक वाचन आणि सरळ विचार. म्हणूनच कीं काय, त्यांची कन्या वैजयन्ती, जरा अवखळ पण अत्यंत बुद्धिमान्, नवमतवादी, जरा तामसी आणि स्वतःच्या पायांवर उभें राहाण्याची इच्छा करणारी होती.]

**वैजयन्ती :** बाबा, बाबा, छान चान्स आहे !

**वैजनाथ :** कसला ? वधू पाहिजे म्हणून एखाद्या आफ्रिकेंतल्या हिप्पॉपोटॅमसला ?

**वैजयन्ती :** बाबा, काय हें ? मुलींना हर्षविणारी लग्न ही एकच चीज असते अशी तुमची कल्पना कां व्हावी ?

**वैजनाथ :** मग काय आहे ? एखाद्या लांबच्या बाईला दुतोंडी मूल, नाहीं तर एकदम तीनचार पोरं झालीं असतील !

**वैजयन्ती :** शीः शीः शीः ! लग्न नि पोरं ! पोरं नि लग्न ! सगळीकडे तींच गटारं. नोकरीची जाहिरात आहे बाबा त्यांत.

**वैजनाथ :** तूं नोकरी करणार ? इतक्या दिवस नुसतं ऐकत होतों. खरंच सांगतेस तूं हें ?

**वैजयन्ती :** होय, अगदीं खरं.

**वैजनाथ :** विजू, तुला काय कमी आहे ? खायला आहे, प्यायला आहे, नोकरमाणसं आहेत, मी आहें. नोकरी करायची भिकार दशा तुला कशाला आठवली ?

**वैजयन्ती :** बाबा, कुक्कुबाळ समजतां तुम्हीं मला अजून ? पैसा स्वतः मिळवल्याशिवाय त्याची किंमत नाहीं कळायची आम्हांला — आम्हां खार्चिक पोरींना. स्वतःच्या पायांवर उभं राह्यचं आहे मला.

**वैजनाथ :** [ तिच्या पायांकडे पाहात ] नको विजू, दमतील ते ! मुलींनीं चंद्रबळ आणूं नये. तूं खा, पी, मजा कर.

**वैजयन्ती :** भलतंच ! ही चाललें मी.

* * * *

[ दोन चार लुकडे तरुण विजूच्या आधींच येऊन आशाळभूतपणानें इकडे तिकडे बावळटासारखे पाहात असतात. विजूची तेजस्वी मूर्ती पाहून जरा बावरतात. विजू बाकावर बसते. ]

**मनोहर :** लोखंडे, आंत या.

[ एक तरुण आंत जातो. ]

**मनोहर :** लोखंडे का तुमचं नांव ? छान आहे, छान आहे. तुम्हीं काय म्हणून स्वतःला ह्या जागेकरतां पात्र समजतां ?

**लोखंडे :** [ गोंधळून ] पात्र ? मी समजतों ? मी नाहीं समजत स्वतःला पात्र.

**मनोहर :** नाहीं समजत ना ? मग जा तर. पितळेऽऽऽ तुम्हीं या आंत.

[ दुसरा तरुण आंत जातो. पाहिला वाकडें तोंड करीत बाहेर येतो. ]

**मनोहर :** [ त्याच्याकडे बारकाईनें पाहात ] काय पितळे? नोकरी करणार म्हणतां?

**पितळे :** असंच कांहीं नाहीं. तांबाकांठ्यावर माझ्या वडलांचं दुकान आहे, तें देखील चालवीन म्हणतोंयू.

**मनोहर :** आँ! असला दुटप्पी तरुण नको आम्हांला. जा तुम्हीं. तांब्यांना पाठवा. लोखंडे, पितळे, तांबे, सर्व अर्जदारांची त्रिरशी तोफ करा नि बांधा ह्या 'तरुण'च्या संपादकाला तिच्या तोंडीं! तांबे, या लवकर!

**तांबे :** गरीब आहें मी......

**मनोहर :** तुमची दृष्टि त्यापेक्षांही गरीब दिसते. ऐन पंचविशींत केवढा हा जाड भिंगांचा चष्मा! तुम्ही नाहीं लायक ह्या कामाला. जा, जा, जा. लवकरच जा. आणखी कोण आहे?

**वैजयन्ती :** [ झटकन प्रवेश करीत ] मी आहें.

[ संपादकांचा चेहेरा निवळत जातो. चेहेऱ्यावर स्मित झळकतें. ]

**मनोहर :** या, या, आंत या. बसा ना. गुड्! तुम्हीं नोकरी करणार म्हणतां?

**विजू :** हो, काय हरकत आहे?

**मनोहर :** नाहीं, हरकत नाहीं कांहींच. पण तुम्हीं मोठ्यांच्या मुली. तुम्हांला जमेल का हें?

**विजू :** जमेल कीं नाहीं हा प्रश्न माझा आहे.

**मनोहर :** नाहीं, खरं आहे तें. जमेल कीं नाहीं हा प्रश्न तुमचाच आहे कीं. आजकालच्या मुली स्वतःविषयींचे मोटमोठे प्रश्न स्वतःच सोडवतात म्हणा!

**विजू :** हो ना! स्त्रिया सुधारत चालल्या आहेत.

**मनोहर :** अवांतर गोष्टी राहूं द्यात. इथें काम भरपूर करावं लागेल. प्रुफं तपासावीं लागतील. लेख – मी लिहिलेले अग्रलेख – फिरून एकदा कदाचित् सुवाच्य अक्षरांत लिहून काढावे लागतील नि हज्जार कामं निघतील. पगार मात्र नाहीं म्हटलं तरी मी देईन पंचवीस रुपये तुम्हांला, बरं का?

**विजू :** काय पंचवीसच? अवघे पंचवीस! हज्जार कामं करून त्याच्या एक चाळिसांश पगार! आमच्या गणू आचाऱ्यापेक्षां पांचच रुपये पगार जास्त मला तर?

**मनोहर :** हें पाहा, पैसा हेंच सर्वस्व नाहीं जगामध्यें. तुमच्यासारख्यांनीं तर त्याची पर्वा कधींच करूं नये. वृत्तपत्राच्या धांदली व्यवसायांत पडल्यावर, जाणून बुजून माणूस देवी सरस्वतीची सेवा करतो नि त्याचा मत्सर वाटून देवी लक्ष्मी त्याच्यावर साहजिकच रुष्ट होते. खरं ना ? मग ठरलं तर ?

**विजू :** हो, ठरलं. अगदीं कबूल.

* * * *

[ सानपूरचे पेन्शनर रावसाहेब विजयकर दुपारचा चहा बहुतेक वैजनाथांच्या घरीं ठोकीत असतात. पेन्शनर असूनही सरळ धिप्पाड शरीरयष्टीचा, खणखणीत आवाजाचा, रुबाबदार चेहेऱ्याचा पण वास्तविक आडमुठा असा हा गृहस्थ असतो. ]

**वैजनाथ :** यावं, यावं रावसाहेब.

**विजयकर :** तुम्हीं 'यावं रावसाहेब' असं रोज म्हणायचं, आम्हीं तें रोज ऐकायचं नि आंत यायचं हें अगदीं सूर्योदयाप्रमाणें ठरलेलं दिसतंय. काय खबरबात ?

**वैजनाथ :** आज सानपूरची खबर लहानसहान नाहीं. महापुराएवढी मोठी आहे ती.

**विजयकर :** काय म्हणतां ? तुम्हीं रावसाहेब झालांत कीं काय ?

**वैजनाथ :** छे हो, आम्हांला कोण करतो 'रावसाहेब' ? त्याला तुमच्यासारखी पूर्वपुण्याई, कामाविषयीं आस्था, दीर्घोद्योग असे कांहीं सद्गुण लागतात. आमच्यांत जर त्यांतील कांहींच नाहीं तर आमच्यासारख्यानें कां त्याची अपेक्षा करावी ?

**विजयकर :** तें जाऊं द्या हो, आधीं खबर सांगा.

**वैजनाथ :** चहाच्या कपांतलंच वादळ आहे म्हणा ! आमची विजू......

**विजयकर :** लग्न ठरलं वाटतं तिचं, रावसाहेब किडमिड्यांच्या मुलाशीं ?

**वैजनाथ :** छे हो ! तसं असतं तर सुतकी चेहेरा कशाला करून बसलों असतों मी ? अहो, काय सांगूं तुम्हांला ? नोकरी करणार असं सांगून गेली सुद्धा आज सकाळीं ती !

**विजयकर :** नोकरी करणार ? नि तुमची विजू ? काय म्हणतां तरी काय ?

**वैजनाथ :** अगदीं खरं आहे हें. नोकरी करणार.

**विजयकर :** म्हणे नोकरी करणार ! भाकऱ्या करायच्या सोडून नोकऱ्या करायची अवदसा आठवली आहे आजकाल पोरींना. छे, छे, छे. तुम्ही म्हणतां तेंच खरं आहे वैजनाथ. धर्म बुडालाच पण रीतभात, पद्धत नि आपली संस्कृति देखील बुडाली.

**वैजनाथ :** अहो बुडाली म्हणजे काय साफ बुडाली; अगदीं रसातळाला गेली.

* * * *

[ छापखाना. विजू प्रूफें तपाशीत आहे. टाळके मोठ्यानें वाचीत आहेत. ]

**टाळके :** जर्मनांची एक सबमरीन् इंग्लिश खाडीजवळ बुडविली – बुडविली म्हणजे अगदीं रसातळाला गेली.

**विजू :** जरा हळू वाचा ना. किती जवळ बसलें आहें मी तुमच्या नि शिवाय तरुण आहें. कान तीक्ष्ण आहेत माझे.

**टाळके :** तीक्ष्ण आहेत ना ? असणारच ! तरुण मुलांचे डोळे नि तरुण मुलींचे कान फार तीक्ष्ण असतात बाईसाहेब.

**विजू :** बाईसाहेब ? टाळके, जरा सांभाळून बोला हं. बाईसाहेब म्हण मी का एखादी जख्खड मास्तरीणकाकू दिसतें वाटतं ? नांवानें हाक मारा, नाहीं तर ताई म्हणा, ताईसाहेब म्हणा. वाटल्यास विजू देखील म्हणा. वडलांसारखे तुम्ही. काय हरकत आहे ?

**टाळके :** खरंच, काय हरकत आहे ? हल्लींच्या पोरी भडक खऱ्या पण कांहीं वेळां तितक्याच समजूतदार देखील असतात. पण कांहीं कांहीं वेळांच हं !

**विजू :** हं, वाचा पाहूं आतां.

**टाळके :** श्वेत रशियामध्यें......आई गऽऽऽ सकाळपासुन वाचून वाचून माझे डोळे मात्र श्वेत व्हायची पाळी आली आहे.

**विजू :** विश्रांति घ्या जरा. जून पोफळीच्या झाडानें वर्तमानपत्राच्या वादळी व्यवसायांत नि बातम्यांच्या पावसाच्या सरींत टिकाव लागेल अशी आशा कधींही करूं नये. आम्ही तरुण आहोंत, चिंचेच्या झाडाप्रमाणें आहोंत. तरी सुद्धा मुळासकट उपटून जातों कीं काय अशी भीति वाटते.

**टाळके :** झालं, जातीवर गेलांत ! स्त्रिया कितीही शिकल्या तरी स्त्रियाच त्या. पिकल्या पानाला पोफळीच्या झाडाची सुंदर उपमा देऊन, शेवटीं दुसरी उपमा

देतांना स्त्रीसुलभ आवडीनें चिंचेचं झाडच सुचलं तुम्हांला! अशिक्षित बायकांना चिंचा आवडतात नि सुशिक्षित बायकांना त्या आवडत नाहींत असं थोडंच आहे म्हणा? खरंच, स्त्रिया चिंचा, कैऱ्या, आंबट बोरं असले पदार्थ खायचे सोडतील तेव्हांच मला वाटतं पुरुष दारू सोडतील.

* * * *

[त्या दिवशीं सूर्यास्ताचा सुमार. सुगंध्यांच्या घरीं विजू परत येऊन, विश्रांतीकरितां आरामखुर्चीवर लवंडली आहे. वैजनाथ येतात.]

**वैजनाथ :** विदुषी वैजयन्तीबाई, प्रणाम. नोकरी मिळाली वाटतं? तरीच उशीर झालेला दिसतो आहे. नि चेहऱ्यावरचा थकवा, पिक्चर पाहिल्यानंतरचा लाडिक नसुन, श्रमांचा वाटतो आहे मला.

**विजू :** हो, मिळाली मला नोकरी.

**वैजनाथ :** कुठें?

**विजू :** मनोहरांच्या कचेरींत.

**वैजनाथ :** मनोहरांच्या? म्हणजे त्या 'तरुण' दैनिकांत?

**विजू :** होय.

**वैजनाथ :** पेपर विकणार वाटतं?

**विजू :** अशी चेष्टा करणार असाल तर मी नाहीं सांगणार.

**वैजनाथ :** कदाचित सांगणार देखील नाहींस. 'इकॉनॉमिकली इंडिपेंडंट' कन्या तुम्ही. तुम्हीं कांहींही करूं शकतां. नाहीं का?

**विजू :** असंच नाहीं केवळ. आपले दक्षिणी पुरुष स्त्रियांचे पाय पाठीमागें खेचतात वारंवार, त्याची येते मला चीड. तुम्हीच पाहा ना, चांगलं मला उत्तेजन द्यायचं, शाबासकी द्यायची, तें राह्यलं बाजूलाच नि म्हणे पेपर विकणार का? प्रुफं वाचणार आहें मी.

**वैजनाथ :** अरेरे! प्रुफं वाचणार? त्यापेक्षां पेपर विकायचं काम जास्त बरं. झालाच तर त्रास पायांना. डोळ्यांना नि मेंदूला नाहीं व्हायचा.

**विजू :** बरं, बरं.

**वैजनाथ :** म्हणे उत्तेजन द्यायचं, शाबासकी द्यायची! कशाबद्दल, तर नोकरी करण्याबद्दल. जें मुळांतच मला पटत नाहीं त्याबद्दल मी डांगोरा कसा पिटूं?

**विजू :** मग निदान चिडवूं तरी नका मला.

**वैजनाथ :** नोकरीची गुलामगिरी पत्करण्यापेक्षां एखाद्या पुरुषाची गुलामगिरी पत्करली असतीस तर जास्त बरं वाटलं असतं मला.

**विजू :** तो विषय माझ्यासमोर नका काढूं अगदीं. मला कांहीं भरीव कार्य करायचं आहे. समाजकार्य आहे, राष्ट्रकार्य आहे, आत्मोन्नति आहे, कितीतरी गोष्टी आहेत. नवऱ्याचं लोढणं गळ्यांत अडकवलं, कीं इकडची मान तिकडे नाहीं करतां यायची मला.

* * * *

[ मनोहरच्या कचेरींत, मनोहरसमोर विजू कांहीं लिहून घेण्याच्या तयारींत आहे. ]

**मनोहर :** हं, घ्या लिहून, 'बंगालच्या जनतेची ' अं हं – 'बंगालच्या दुर्दैवी जनतेची दारुण परिस्थिति पाहून मन उद्विग्न होतें. मातांनीं विकलेलीं अर्भकें, उपासमारीनें तडफडून तडफडून मृत्युमुखीं पडणारीं कोवळीं पोरें व त्यांचीं हृदयद्रावक छायाचित्रें पाहून पोटांत कालवाकालव होते !' थांबा, कोंडिबा, समोरच्या इराण्याकडून दोन ऑम्लेटस, चार स्लाईस नि कॉफी मागव. त्याला सांग, ऑम्लेटांत कांदा जास्त टाक, बरं का ! तेव्हां काय तर, हं ! 'कालवाकालव होते.'

**विजू :** इतकं चांगलं चांगलं खायला मागवायचं तर असा अग्रलेख लिहितांनाच वेळ योग्य, नाहीं का ?

**मनोहर :** [ जरा वरमून ] तसं नव्हे, धंदा आहे हा. शिवाय माझा आत्मा नि शरीर ह्यांची मैत्री आहे तोंपर्यंत गरिबांचा कैवार नि स्त्रियांचा उद्धार मला शक्य आहे, नाहीं का ? असं सामाजिक कार्य करायला उत्तम शरीरसंपत्ति नि ती टिकायला बैद्यांचा बहुरंगी खुराक नको का खायला ?

**विजू :** असेल, तसंही असेल.

**मनोहर :** स्फूर्तीचा झरा तुमच्या बडबडीमुळें आटला. अग्रलेख मी मागाहून लिहीन. जा तुम्ही आतां ... घरीं नव्हे, टाळक्यांबरोबर नीट काम करा नि शिका सर्व. तुमच्या तैलबुद्धीचा नीट उपयोग कराल तर स्त्रियांच्या उद्धाराला तुम्हीं देखील कारणीभूत व्हाल. कुणीं सांगावं ? अच्छा ! चिअर् अप्.

* * * *

[ रावसाहेब दीनानाथ विजयकर ह्यांचा प्रशस्त बंगला. नेहमींचा म्हातारा माळी. विशेषतः जुनी नाहीं, पण फार नवी नाहीं अशी रावसाहेबांची धुळीनें भरलेली गाडी पोर्चमध्यें अदमासानें उभी राहाते. त्यांतुन एक शरीरानें उत्तम पण बुद्धीनें यथातथाच आणि अर्थात्‌दिसायला सुंदर असा एक तरुण उतरतो. हा त्यांचा मुलगा हें सांगायला नकोच. ]

**त्यागनाथ :** रामा, आंत घेऊन ये रॅकेटस्.

[ चालू असलेल्या कोणत्याही फिल्म मधील गाणें गायचा प्रयत्न करीत आंत शिरतो. ]

**त्यागनाथ :** रामा, कॉफी घेऊन ये.

**रामा :** जी.

**त्यागनाथ :** नि हें बघ, आधीं गार पाणी आण.

**रामा :** जी.

**त्यागनाथ :** टॉवेल आणायला विसरूं नकोस.

**रामा :** जी.

**त्यागनाथ :** बाबा काय करताहेत ?

**रामा :** धनी वर हायती.

[ रावसाहेब गोपीनाथ किडमिडे प्रवेश करतात. ]

**गोपीनाथ :** काय नथ्या ?

**त्यागनाथ :** [ जरा रागानें पाहात ] अहो, जरा मला हाक नीट मारीत जा, बरं का.

**गोपीनाथ :** [ मिशांवरून हात फिरवीत चष्म्यांतुन सूक्ष्मपणें त्याला न्याहाळीत ] अरे गाढवाच्या लेका......

[ रावसाहेब व दीनानाथ जिन्यावरून खालीं येत असतात, त्यांना धक्का बसतो. ते गोपीनाथांकडे ओथंबत्या मित्रप्रेमानें पाहातात. त्यांना त्याची जाणीवही नसते ! ]

**गोपीनाथः** अरे गाढवाच्या लेका, मला गोष्टी शिकवितोस होय ! एवढा एवढा होतास [ हातानें त्याचा आकार अर्धा फूट दाखवितात ] तेव्हां तूं माझा

कोट नि धोतरच खराब करायचास. आतां मात्र तुझ्या उद्दाम वागण्यानें माझं डोकंही खराब करायला लागलास कीं लेका! म्हणे नीट हाक मारा! तुझा बाप एवढा माझ्यासारखाच रावसाहेब आहे तरी त्याला सुद्धा मी प्रेमांत आलों म्हणजे 'ए दिन्याऽऽऽऽ' अशी हाक मारतों. तूं तर लेका एक इवलीशी अळी आहेस.

**दीनानाथ** : [ खालीं उतरत ] जाऊं द्या हो, लहान आहे तो.

**गोपीनाथ** : [ वेडावून ] अॅहॅहॅऽऽ लहान आहे म्हणे! भिंगरी आणा नि खोचा त्याच्या बटन् होलमध्यें. बाकी श्रीमंतांचीं पोरं वयाच्या मानानें मूर्ख असतात हीच गोष्ट खरी.

**दीनानाथ** : तें राहूं द्या हो! श्रीमंतांच्या मुलींनाही हा नियम तितकाच लागू असतो हें माहीत आहे ना तुम्हांला?

**गोपीनाथ** : माझ्या मुलीला टोमणा देऊं नका तुम्हीं. माझी मुलगी शिकली तरी त्या तेजस्वी विदुषीच्या शिंकण्यांतील झंकाराच्या मजलशीची ओळख पटून, केवळ टेनिस खेळणारे खिलाडू तरुण धूम ठोकतात, नि धूम पण कशी तर 'जसे हवेस पाहून मच्छर' ह्या जाहिरातीप्रमाणें!

**दीनानाथ** : तें जाऊं दे रे गोपीनाथ, आधीं बैस. अगदीं तुझी वाट पाहात होतों. त्यागनाथ, तूं जा. वडील माणसांचा मान ठेवावा. [ गोपीनाथ मिशांना पीळ भरतात ] हल्लींच्या ह्या पोरांना वडील माणसांचा मान, त्यांच्याविषयीं आदर वगैरे अगदीं कांहीं म्हणतां कांहीं देखील नसतं हो!

**गोपीनाथ** : दीनानाथ, कलियुग आहे हें. चालायचंच! पण वाट कशाला पाहात होतास एवढी?

**दीनानाथ** : अरे आपला वैजनाथ......

**गोपीनाथ** : [ घाबरून ] आटपला वाटतं कारभार?

**दीनानाथ** : किती मूर्ख आहेस रे? त्याची विजू......

**गोपीनाथ** : पळाली वाटतं हात धरून कुणाचा?

**दीनानाथ** : [ कपाळावर हात मारीत ] अगदीं खरंच मूर्ख आहेस तूं. अरे मला बोलूं तरी दे.

**गोपीनाथ** : बोल बाबाऽऽऽ बोल.

**दीनानाथ** : अरे नोकरी धरली तिनें.

**गोपीनाथ** : [ चेहेरा विस्फारीत ] काय म्हणतोस काय ? काय वेड धरलं हें तिनें ?

**दीनानाथ** : हरि जाणे! आजकाल दुनिया उलटी होत चालली आहे. बायकांनीं नोकऱ्या कराव्या, पुरुषांनीं भाकऱ्या भाजाव्या. मातृपदाचं लोढणं धूर्तपणानें निसर्गानें स्त्रीजातीवर अनादिकालापासून लादलं नसतं तर पुरुषांची स्थिति आज केविलवाणी झाली असती. पण मी म्हणतों, वैजनाथ......

**वैजनाथ** : [ प्रवेश करीत ] काय चाललं आहे माझ्याविषयीं खलबत ?

[ दीनानाथ व गोपीनाथ थोडे वरमतात. ]

**दीनानाथ** : तसं नव्हे हो, म्हटलं तुमची विजू, नोकरी करते तें. चालतं कसं तुम्हांला ? चांगलं लग्न ठोकून टाका तिचं.

**त्यागनाथ** : [ शेवटचे शब्द लक्षपूर्वक ऐकत प्रवेश करतो. ] लग्न ? कुणाचं लग्न ?

**दीनानाथ** : तुझं नव्हे रे, घाबरूं नकोस. ह्यांच्या विजूविषयीं बोलत होतों आम्ही.

**त्यागनाथ** : काय विजूविषयीं ? मग तर मला घाबरलंच पाह्यजे.

**गोपीनाथ** : म्हणजे ? [सहेतुक नजरेनें आळीपाळीनें बापलेकांकडे व नंतर वैजनाथांकडे पाहातो. ]

* * * *

[ कुंदा, गोपीनाथरावांची एकोणीस वर्षांची मुलगी, दिसायला काळी सावळी, पण चुणचुणीत, नजरेंत तेज आणि एकंदरींत चपळ ]

**कुंदा** : [ गाणें म्हणत आहे ]

चंद्रमाऽऽऽ गगनीं
चंदेरीऽऽऽ रजनी
विलसत मंद...
एकली मी परीऽऽऽ चंद्रमाऽऽ गगनीं

अय्याऽऽ वेणी नाहीं घातली मीं आज!

[ त्याच गाण्याचा चरण गुणगुणत ड्रेसिंग मिररजवळ स्वतःच्या तिहेरी प्रतिबिंबाकडे पाहून साभिनय तेंच गाणें कंगव्याच्या गतीच्या तालावर म्हणत वेळ काढीत आहे. ]

**यशोदाबाई** : [ रागीट मुद्रेनें प्रवेश करीत ] चटोरपणा आंगीं भिनलाय् तुम्हां पोरींच्या. आरशांत एकसारखीं तोंडं काय बघतां, पावडरी काय फासतां नि गाणीं काय पुटपुटतां दिवसभर? आपल्यासारख्या घरंदाज स्त्रियांना शोभतं तरी का हें?

**कुंदा** : आई, [ लडिवाळपणानें ] त्याला ग काय झालं? [ शेपटा खांद्यावरून टाकीत ] आई, जग सुधारत चाललं आहे, नाहीं का?

**गोपीनाथ** : हो, माहीत आहे सुधारत चाललं आहे तें. जग बुडायची वेळ मात्र आली आहे. ऐकलं का?

[ यशोदाबाई पदर सावरीत टपोऱ्या डोळयांनीं यजमानांकडे पाहातात. ]

**यशोदाबाई** : काय म्हणायचं झालं?

**गोपीनाथ** : म्हणायचं काय नि सांगायचं काय? अग ती वैजनाथची विजू ...

**यशोदाबाई** : [ कानांवर दोन्ही हात ठेवीत आणि डोळे विस्फारीत ] पळाली वाटतं हात धरून कुणाचा?

**गोपीनाथ** : किती मूर्ख आहेस ग!

[ यशोदाबाई अपराध्यासारखा चेहेरा करतात. कुंदा कान टवकारून ऐकते... ]

**कुंदा** : [ न राहावून ] सिनेमांत गेली कीं काय ती?

**गोपीनाथ** : दगडापेक्षां वीट मऊ! छापखान्यांत गेली ती.

**यशोदाबाई** : [ न उमगून ] काय पायखान्यांत?

**गोपीनाथ** : अग गाढवे, पायखान्यांत नाहीं, छापखान्यांत. [ बगलेंतला पेपर तिच्या पुढें फडकावीत ] हा छापतात ती जागा, समजलीस?

**कुंदा** : नोकरीच धरली तिनें ना?

**गोपीनाथ** : ऐका! म्हणे नोकरीच धरली तिनें ना? स्वर्गस्थ सीतादेवी, रुक्मिणीदेवी, महानंदादेवी नि उरल्यासुरल्या पूज्य आर्य महिलांनो, आकाशांत तारकांच्या रूपानें विलसून ह्या कृतघ्न दुनियेला तेजाळ करण्याचा तुमचा हव्यास सोडून, तुम्हीं स्वतःचं पतन करून नि एक भयंकर उल्कापात करून अशा कारट्यांना एका धडाक्यासरशीं बेचिराख कराल तर आमच्यासारख्या कातावलेल्या पितरांवर महा उपकार होतील तुमचे! [ कुंदा व यशोदाबाई हवा गरम आहे असें पाहून पळ काढतात. तो एकटाच बडबडतो ]......बा दुर्दैवी हिंदुस्थाना, काय ही

तुझी अधोगति ! पोरांना आमचा अभिमान नाहीं, आमच्या धर्माचा नाहीं, देशाचा नाहीं, कश्शाचा नाहीं. आहे अभिमान फक्त टेनिसच्या रॅकेटचा नि ड्रेसिंग टेबलांत दिसणाऱ्या स्वतःच्या प्रतिबिंबाचा !

* * * *

**मनोहर** : पुढच्या जन्मीं नापिक होईन, पण संपादक नाहीं होणार. संपादकाच काम अवघड होतं त्याचं कारण अगदीं उघड आहे. त्याच्या स्वतःइतक्या तल्लख मेंदूचीं जर सर्व माणसं त्याच्या भोवतीं काम करीत असतीं तर तीं देखील संपादक नसतीं का झालीं ?

**विजू** : तुम्हांला असं नाहीं ना सुचवायचं, कीं मी मठ्ठ आहें म्हणून ?

**मनोहर** : स्त्रियांच्या आंगीं विपर्यास करायची एक अमोघ शक्ति असते. मी तुम्हांला सहज कांहीं तरी बोललों, तों तें तुम्हीं स्वतःला चिकटवून पाहालंत.

**विजू** : Sorry हं ! मला आपलं वाटलं...

**मनोहर** : वाटलं ? काय वाटलं ?

**विजू** : तसं नव्हे. मला वाटलं, तुम्हीं जरा Serious होतां कीं काय !

**मनोहर** : आहेंच मी Serious.

**विजू** : म्हणजे ? आहांतच कीं काय तुम्हीं Serious ? म्हणजे मी एक मठ्ठ मुलगी आहें अशीच तुमची समजूत आहे तर ?

**मनोहर** : तशी नाहीं समजूत. पण जरा स्पष्टच बोलतों. माफ करा हं. मठ्ठ नाहीं पण फाजील शाहाणी अशी विदुषी, इथें नसते तर्कवितर्क करीत वेळ काढीत असते.

**विजू** : म्हणजे ? मी वेळ काढतें काय ? काम नाहीं मी करीत ? इराण्याकडचीं ऑम्लेटस्, स्लाईसिस् नि कॉफीवर ताव मारीत, तोंडाची गिरणी, गुमास्ता कायद्याला झुगारून अखंड चालू ठेवीत तुम्हीच मात्र वेळ काढीत असतां. जरा स्पष्ट बोललें, माफ करा हं.

**टाळके** : [ आंत डोकावीत ] अहो संपादक, कुणी तरी भेटायला आलं आहे.

**मनोहर** : [ रागावून ] कोण आहे ? आंत पाठवून द्या त्यांना. मिस् तुम्ही घरीं जा आतां. संपादकीय व्यवसाय आहे, हजार तऱ्हांचीं कामं नि लक्ष तऱ्हांचीं लफडीं असायचीं त्यांत. आपण दोघंही स्पष्टवक्ते आहोंत. पुन्हा तर्कवितर्क करीत

इथें वेळ काढूं नका. मलाही ऑम्लेटस, स्लाईसिस नि कॉफीवर ताव मारायला वेळ नाहीं आतां. बाय् बाय् !

★ ★ ★ ★

[ यशवंत – गोपीनाथांचा एकच M. B., B. S. पांच वेळां नापास होणारा मुलगा. त्याची अभ्यासाची मुंबईतली खोली. तो कष्टानें अभ्यास करीत बसला आहे. केस पिंजारलेले आहेत.]

**यशवंत** : बी. ए. व्हायची इच्छा होती माझी... दादांनीं बळजबरीनें मला हा कोर्स दिला, नि घात केला माझ्या आयुष्याचा ! मुळापासून वाङ्मयीन जगांत स्वच्छंद विहार करण्याची आवड असणारा माझा आत्मा — त्याचं अगदीं साफ Dissection झालं ह्या कोर्सनें. आपल्या मुलांना काय हवं असतं हें जेव्हां वडिलांना कळेल त्यांची नैसर्गिक आवड कशांत आहे हें जेव्हां उमजेल, तेव्हांच माझ्यासारखे यशवंत आयुष्यांत खरोखरच यशवंत होतील. हार्टच्या ॲक्शन्स्स टडी करायचा प्रयत्न केला तर मंदा समोर उभी राहाते. वाटतं, केव्हां एकदा परीक्षा होते नि सानपूरला जाऊन सर्वांआधीं – दादा, आई नि कुंदा ह्यांना भेटायच्या आधीं – मंदाला भेटतोंय ! फारच मंद चालले आहेत दिवस ! [ विक्रम शेवटचें वाक्य ऐकतो. ]

[ विक्रम देशपांडे प्रवेश करतो. त्याच कोर्सचा विद्यार्थी. तो, यशवंत, त्यागनाथ आणि मनोहरचाही मित्र असतो. ]

**विक्रम** : मंद आहेस लेका ! अभ्यास कर नीट. पांच वेळां नापास झालास्.

**यशवंत** : साठ वर्षांच्या जख्खड म्हाताऱ्याबद्दल सोळा वर्षांच्या चौथ्या बायकोला जो आदर वाटत असेल तोच किळसवाणा आदर मला वाटतो आहे ह्या अभ्यासाविषयीं विक्रम !

**विक्रम** : असं जर होतं तर इतकीं वर्षं हा मूर्खपणा सतत चालू ठेवलास कशाला ?

**यशवंत** : दादांची इच्छा ! भावनाप्रधान आहें मी. अतिशय भावनाप्रधान आहें मी. दादांना भीत नाहीं मी पण त्यांच्याविषयींच्या फाजील आदरानें माझी ऐन वेळीं मुस्कटदाबी केली नि शेलेच्या नाईटिंगेलबरोबर भराऱ्या मारणारा माझा वाङ्मयीन आत्मा, जो आवडीचे पंख तुटून खालीं कोसळला तो थेट इथल्या ऑपरेशन रूममध्यें तडफडत पडला आहे इतकीं वर्षं.

**विक्रम :** Buck up! Cheer up! Don't be Silly! Damn your Literature! फायनल इअर् आहे. जोर मार. यंदा पास झालास, कीं सुंदरसा दवाखाना, काचेचीं पार्टिशनं, त्याच्या आंत किडाकिडीत कंपौंडर, त्याच्याभोवतीं 'केव्हां येणार' म्हणून रोग्यांची आस्थेवाईक चौकशी, तुझं टुमदार घर, घराबाहेर तुझी छोटीशी 'ऑस्टिन्', घरांत त्याहीपेक्षां नाजूक दोनपायी ऑस्टिन्, तुझा अगदीं "Personal Patient." तुझी गांवांतील लोकप्रियता, तुला मिळणारे अदबीचे सलाम, मृत्यूच्या दाढेंतून वांचविलेल्या जीवांची कृतज्ञतापूर्वक तुझ्याकडे खिळलेली नजर, नवख्या बाळंतिणींच्या तुझ्या दवाखान्यालगतच्या Maternity Ward मधील आर्त किंकाळ्या......

**यशवंत :** पुरे, पुरे! नको तें भेसुर चित्र रंगवूं. चल आपण Pygmallian ला जाऊं. रीगलला आहे.

* * * *

[ त्यागनाथ विमनस्कपणें येरझारा घालीत आहे. विजूच्या लग्नासंबंधींचें बोलणें त्याच्या डोक्यांत घुमत आहे. त्याच्या खोलीसभोवार सर्व शांत आहे. वेळ रात्रीची. खिडकीजवळ येऊन बाहेर पाहातो. मग तान्याकडे टक लावून उगाच वेळ काढतो ... पुन्हा येरझारा. ]

**त्यागनाथ :** तें कांहीं नाहीं. कांहीं तरी युक्ति काढून विजू आपल्या घरीं येईल अशी शक्कल काढली पाहिजे. काय मिजासखोर पोरगी आहे! बिलकुल दाद देत नाहीं. [ कोचावर बसतो. कोचाच्या बाजूला वाचण्याकरितां मोठी शेड असलेला दिवा असतो. अगदीं सहज तो संध्याकाळचें वर्तमानपत्र उचलतो. पहिल्याच पानावर ठळक जाहिरात असते. '★ ★ ★ ★' पिक्चरचा सुवर्णमहोत्सव आजपासून चालू आहे.' वगैरे. कल्पना सुचल्यामुळें चेहेरा प्रफुल्लित होतो. ] वा रे वा! काय पण कल्पना! Fortune favours the brave! जीते रहो पठ्ठे! [ स्वतःच्याच पाठीवर थाप मारतो. ] बाबांना उद्याच पन्नासावं वर्ष पुरं होणार. घरीं करूं त्यांचा सुवर्णमहोत्सव नि ललितागौरीचा नाच. नि गाणं ठेवायला अशा मंगल प्रसंगीं बाबा नाहीं म्हणायचे नाहींत. [ घाई घाईनें जिन्यापाशीं जातांना ] बाबाऽऽ बाबाऽऽऽबाबाऽऽऽ [ बाबा डोकावतात ]

**दीनानाथ :** काय रे, साप बीप निघाला वाटतं ?

**त्यागनाथ :** छे हो! साप वसला? खालीं या, खालीं या. थांबा, थांबा! मीच वर येतों. आतां तुम्हांला वरखाली येतांना ह्यापुढें जरा जाणवेल नाही?

[ बाबा, शरीर ताठ टेऊन, सावकाश खाली येत असतात. त्यांना कळत नाहीं त्याच्या म्हणण्याचा अर्थ. ]

**बाबा :** मी नाही समजलों.

**त्यागनाथ :** आश्चर्य आहे. बाबा, उद्यां काय आहे माहीत आहे?

**बाबा :** नाहीं, विशेष कांहींच नाहीं. त्या धनवंत कुबेरानें माझ्याकडून पन्नास रुपये उसने नेले आहेत ते मात्र लेकाचा उद्यां परत करणार आहे म्हणतोय्.

**त्यागनाथ :** च्, च्, च्, पैसे. बस्स. सर्व ठिकाणी पैस. पन्नास रुपये उद्यां नाहीं परवां परत करील तो कुबेराचा वंशज, पण उद्यां तुम्हांला पन्नास वर्षे पुरीं होणार हें आहे का तुमच्या लक्षांत?

**बाबा:** अरे हो, खरंच कीं!

**त्यागनाथ :** बाबा, नाहीं म्हणायचं नाहीं बरं का! उद्यांचा दिवस आपण साजरा करूं या. तुम्ही तुमच्या मित्रमंडळींना—वैजनाथांना वगैरे—आमंत्रण द्या. छोटीशी पार्टी ॲरेंज करूं आपण. ललितागौरीच्या नाचाची वगैरे व्यवस्था मी करतों. असा सुदिन आयुष्यांत दोन वेळां थोडाच येतो? सुवर्णमहोत्सवाला पांच पन्नास रुपये खर्च झाले म्हणून झालं काय? नाहीं तरी ते धनवंत कुबेराचे पन्नास रुपये बुडीत खातींच धरले होतेत.

**बाबा :** बरं जा, कांहीं हरकत नाहीं. सर्वांना बोलाव अगदीं सहकुटुंब सहपरिवार. वैजनाथाला देखील.

* * * *

[ रावसाहेब दीनानाथांच्या हॉल्मध्यें बैठकीची उत्तम व्यवस्था केली आहे खुर्च्यांचीच रेलचेल् आहे असें नव्हे तर तक्के गाद्याही खूप पसरल्या आहेत. बडीबडीं धेंडें जमलीं आहेत. ललितागौरी हें फार 'पॉप्युलर' पात्र आहे. म्हाताऱ्याचा पोषाख रंगेल दिसत आहे. ललितागौरी प्रवेश करते. माना उंचावतात, नजरा वळतात, गाणें सुरू होतें. नाच होतो. लोक बेहद्द खूष असतात. दुसरा नाच सुरू असतांना......]

**त्यागनाथ** : कां हो वैजनाथ, 'सर्व' मंडळी नाही वाटतं आली ?

**वैजनाथ** : मंडळी आली आहे. पण 'सर्व' मंडळी मनोहरबरोबर येणार आहे.

**त्यागनाथ** : [ आंबट चेहेरा करून ] असं का ? छान. ठीक आहे, ठीक आहे.

[ उद्विग्नपणें बंगल्याच्या बागेंत येतो. संगीताचे मंजुळ सूर वाऱ्यावर ऐकूं येतात. एका अर्धनग्न पुतळ्यापाशीं तो उभा राहातो. वर पाहातो तों पौर्णिमेचा चंद्र हसतो आहे, रातराणीचा सुगंध दरवळतो आहे आणि त्याला जरा हलकें वाटल्यासारखें वाटतें, तोंच खिदळण्याचा आवाज ऐकूं येतो. खचित विजूचाच आवाज तो. तो कान टवकारून छपून ऐकतो. ]

**मनोहर** : खरंच, पौर्णिमेच्या चंद्राला पाहिलं, कीं तुम्हांला कसली आठवण होते ?

[ झटकन् विजू त्याच्याकडे पाहाते. तो निर्विकार असतो. ]

**विजू** : हें पाहा, तुम्हांला कसली होते तें सांगा पाहूं आधीं.

**मनोहर** : अगदीं खरं सांगू ?

**विजू** : तुम्ही संपादक असून सुद्धा सहसा खोटं बोलत नाहीं हें मी धरून चालतें.

**मनोहर** : [ हसतो ] माझ्या मुंजीमध्यें माझ्या आजोबांनीं, सबंध महिन्याची पेन्शन् देऊन मला जी एक चांदीची ताटली आहेर म्हणून दिली, त्या ताटलीची, त्या ताटलीमुळें आजोबांची नि त्यांच्या चंद्रासारख्याच शीतल प्रेमाची आठवण होते. तुम्हांला काय वाटतं ?

**विजू** : आम्ही बायका. दुसऱ्यानें आहेर दिलेल्या त्याच ताटल्या उलट्या करून, ऐदी पुरुषांच्या लालचावलेल्या जिभांची हौस पुरवण्याकरतां त्यांवर पापड्या घालतों, त्या पापड्यांची आठवण होते मला.

**मनोहर** : हे अन्नपूर्णादेवी, भक्ताचा तुला प्रणाम आहे. काय हें वैजयंतीबाई ? तुमच्यासारख्या सुशिक्षित, सुसंस्कृत नि बुद्धिमान् स्त्रियांच्या कल्पनेची भरारी एखाद्या क्षुद्र ताटलीभोवतींच रिंगण घालीत राहावी ना ?

**विजू** : जाऊं द्या तें ! गाणं ऐकायचं, कीं इथेंच गप्पा मारायच्या ?

**मनोहर :** मला वाटतं इथेंच बसलं तर गप्पा मारतां येतील नि गप्पांना खंड पडला तर गाणं ऐकूं येईल, खरं ना ?

**विजू :** अगदीं खरं. रसिक आहांत तुम्ही.

* * * *

[ त्यागनाथ अर्थपूर्वक मान डोलावीत सटकतो. संगीताचे सुर वाऱ्यावर वाहात येत असतात. त्या दोघांचीं अंत:करणें प्रफुल्लित होतात. कांहीं वेळानें कार्यक्रम खलास होतो. सामसूम. ]

[ अस्वस्थ त्यागनाथ रेडिओ सुरू करतो, बंद करतो. पंखा लावतो, बंद करतो. पुस्तक उघडतो, दूर फेकतो. समोर पाहातो. एक जोडपें – अर्थात् तरुण आणि सुंदर – पूर्ण चंद्रम्याकडे पाहात आहे, असा देखावा भडकपणें दाखविणाऱ्या एका ठळक कॅलेंडरकडे त्याचें लक्ष जातें. तो त्या कॅलेंडरच्या जवळ जातो. त्यांतील चंद्रावर बोट ठेवतो... ]

**त्यागनाथ :** आजोबांनीं दिलेली चांदीची ताटली काय ? तीच ताटली उलटी करून त्यावर घातलेल्या पापड्या काय ? अरेरे, चंद्रा ! काय तुझी ही विटंबना ? राहूची रदबदली करून तूं स्वत:ला कायमचं खग्रास ग्रहण लावून घेऊन ही निर्भत्सना एकदा कायमची कां बंद करून घेत नाहींस ? म्हणे ताटली नि पापडी ! त्यागनाथ आहे नांवाचा. वाटेल तो त्याग करीन पण मनोहरच्या मनोहर प्रेमचंद्राच्या चंद्रकलेची चंदेरी ताटली, लाथेच्या ठोकरीसरशी उडवीत, तळलेल्या पापडीसारखी गत नाहीं करीन तिची तर नांवाचा त्यागनाथच नाहीं मी ! [ हिसक्यासरशीं कॅलेंडर फाडतो. ]

[ बेल वाजते. तारवाला येतो. ]

**त्यागनाथ :** अरे सही कुठें करूं ?

**तारवाला :** शेट्, नंबर तेरा नव्ह का ?

**त्यागनाथ :** छान ! इथेंही तेराच का ? बरं हरकत नाहीं. [ सही करतो. ]

[ तार – " Arriving today, meet Station "

—Vikram-Yeshwant]

**त्यागनाथ :** गुड् ! विक्रम नि यशवंत येणार. आतां जरा 'बोअर्डम्' कमी होईल. तासाभरांत गाडी येईलच ...

*   *   *   *

[ स्टेशन्. गाडी येते. सेकंड क्लासमधून विक्रम व यशवंत उतरतात. त्यागनाथ त्यांना 'रिसीव्ह' करतो. जरा वेळ जातो त्यांना हुडकण्यांत. त्याची कल्पना असते, विक्रम बरोबर असल्यामुळें यशवंत 'थर्ड'नें प्रवास करील. ]

**त्यागनाथ :** हॅलो ! How are you chums ? So glad to see you. really, so glad !

**विक्रम :** यस् यस्. पोर्टर, सामान उचल.

**त्यागनाथ :** काय रे 'सेकंड'नें कसे आलांत ?

**यशवंत :** [ मिस्किलपणें ] माझेही फादर रावसाहेब आहेत म्हटलं.

**त्यागनाथ :** तसं नव्हे रे. अरे हा 'भाई' आहे ना बरोबर ? मूर्तिमंत समतेच्या बरोबर प्रवास करायचा विषम वर्गातून, छान !

**विक्रम :** खरं म्हणजे माझ्या प्रिन्सिपलच्या विरुद्ध मी ट्रॅव्हल् केला केवळ यशवंतसाठीं. त्याच्यासाठीं स्वार्थत्याग केला मीं !

**त्यागनाथ :** अतुल स्वार्थत्याग ! काय हें मित्रप्रेम !

**विक्रम :** ए हमाल, सुनता नहीं ? जंगली ! सामान उठाव. चार आणे देईन.

**पोर्टर् :** चार डागाचे आठ आणे द्यावे लागतील. बिल्ल्यावर भावच हाय तो.

**विक्रम :** काय ? चार डागाचे आठ आणे ? [ पोर्टर बिल्ला दाखवितो. ] डाग दिले पाह्यजेत ह्या लोकांना !

**यशवंत :** जाऊं दे रे, उचल बाबा उचल.

**विक्रम :** अरे टांगा पाहा कीं.

**त्यागनाथ :** कांहीं नको टांगा, गप्पा करीत जाऊं आपण. बरेच दिवसांनीं भेटलों आहोंत. हमाल, सामान किडमिड्यांच्या घरीं घेऊन जा टांग्यांतून. हे पैसे घे.

[ हमाल चालत जाणाऱ्या त्या विचित्र त्रयीकडे पाहात टांग्यांतून जातो. ]

**यशवंत :** काय खबर आहे त्यागनाथ सानपूरची ?

**त्यागनाथ :** अरे खड्ड्यांत पडलों.

**विक्रम :** अरेरे ! पाय मुरगळला कीं काय मग तुझा ?

**त्यागनाथ :** पाय मुरगळला असता तर मसाजिस्ट्नें बरा केला असता. पण मुरगळलेल्या हृदयाला विरंगुळा देणारा मसाजिस्ट् अजून दुनियेवर अवतरायचा आहे !

**यशवंत :** म्हणजे ? तूंही प्रेमांत पडलास त्यागनाथ ?

**त्यागनाथ :** मी पडलों आहें, पण ती नाहीं ना चळवळींत भाग घेत ! असहकार पुकारलाय् तिनें.

**विक्रम :** ओ ! आय सी !

**यशवंत :** इन्डीड् ए सीरियस् केस्—ए सीरियस् केस् ऑफ् हार्ट् ट्रबल्.

**त्यागनाथ :** विक्रम, तूं माझ्या घरीं चल.

**यशवंत :** नो, नो विक्रम, यू कान्ट.

**त्यागनाथ :** विक्रम, चक्रमपणा करूं नकोस. माझ्या घरीं चल. माझ्याही घरीं तुझी व्यवस्था छान होईल. [ यशवंतकडे पाहात ] माझेही फादर रावसाहेब आहेत म्हटलं !

**विक्रम :** बरं बरं, येतों मी. मला काय कुठेंही सारखंच. भाईच मी. सर्व जगभर माझे ‘ भाई ’ आहेत.

**यशवंत :** हें बरं नाहीं...

**त्यागनाथ :** प्लीज् यशवंत. काम जरा महत्त्वाचं आहे. विक्रम आला तरच तें होईल.

**यशवंत :** बरं, जा; पण सकाळ संध्याकाळ मला भेटलं पाहिजे हं. तुझं सामान देईन मग पाठवून. [ विक्रम ‘ अच्छा ’ म्हणतो व ते जातात. ]

* * * *

[ संपादक कचेरींत जायच्या घाईत आहेत. पोस्टमन् पुस्तक देतो त्यांना. घाईनें ते वेष्टन उघडतात. आंत चिठ्ठी असते. ]

“ तुझ्या २५ व्या वाढदिवसानिमित्त सप्रेम भेट. ”

तुझी चंदा

**मनोहर** : ग्रँड् ! गडकऱ्यांची वाग्वैजयंति. मेवाच मिळाला आज !

[ कचेरींत पुस्तक घेऊन जातो. ]

**टाळके** : कसलं हो नवं पुस्तक ?

**मनोहर** : कसलं ? सांगा पाहूं तुम्हीच.

**टाळके** : [ डोकं खाजवून ] सुदाम्याचे पोहे.

**मनोहर** : सुदाम्याच्या सांपत्तिक स्थितीपेक्षांही तुमची कल्पनाशक्ति दरिद्री आहे हो !

**टाळके** : अगदीं शक्य आहे. म्हणुनच नोकरी करूं शकतों वृत्तपत्रीय कचेरींत.

**मनोहर** : शाबास ! वाक्य दुधारी आहे. पुस्तकाचं नांव ' वैजयंति '...

**टाळके** : काय ? वैजयंति ?

**मनोहर** : हो, वैजयंति—नाहीं, वाग्वैजयंति...

**टाळके** : नाहीं वैजयंतीच असेल.

**मनोहर** : नाहीं टाळके, वाग्वैजयंतीच ... [ आंत खुर्चीत जातो. टेबलावर बसतो. त्यावर चिठ्ठी असते वैजयंतीची—" बरं वाटत नसल्यामुळें आज येतां येणार नाहीं. उद्यां नक्की येतें. " नकळत मनोहरचा चेहेरा मावळतो व त्याची नजर तिच्या खुर्चीकडे वळते. ]

* * * *

[ वैजयंति. वेणी न घातल्यामुळें केस पिंजारले आहेत. पुस्तकें वाचकरत आहे. ]

**वैजयंति**: मेलीं सर्वं पुस्तकं वाचून झालीं. कांऽऽहीं नाहीं वाचायला.

[ टपकन् आवाज होतो. दारावरच्या जाळींतून अंक पडतो. धावत जाऊन ती तो उचलते व उघडते. ]

**वैजयंति** : 'मनोहर !' जिकडे तिकडे मनोहर. ' तरुण 'मध्यें नोकरी धरायच्या आधीं हेंच मासिक मला किती किती आवडायचं ! आतां त्याचं नांव ' मनोहर ' आहे म्हणूनच मला तें आवडेनासं झालं आहे कीं फारच आवडूं लागलं आहे कोण जाणें ?...

* * * *

[ दुसरा दिवस. वैजयंति ऑफिसांत गेली आहे. ]

**मनोहर** : काय हो ? कशी काय तब्येत आहे ?

**विजू** : थँक्स, बरी आहे आतां.

**मनोहर** : काल मजा झाली एक.

**विजू** : काय ?

**मनोहर** : एका फ्रेंड्नें वाढदिवसानिमित्त पुस्तक पाठवलं मला. टाळक्यांनीं त्याचं नांव विचारतांच ' वाग्वैजयंति ' ऐवजीं वैजयंतीच म्हणत सुटलों एकसारखा !

**विजू** : [ त्याच्याकडे रोखून पाहात, त्याचा प्रत्येक शब्द लक्षपूर्वक ऐकत असते. ] असं का ? छान ! आमच्या घरींही मजाच झाली काल एक.

**मनोहर** : काय ?

**विजू** : वाचायला कांहीं नाहीं म्हणून चिडून पुस्तक हाताळीत होतें तोंच पोस्ट्मननें अंक टाकला नवीन. धावत जाऊन पाहिला, तों तो होता ' मनोहर.' वाचलाच नाहीं मग तो !

**मनोहर** : मुद्दाम नांवामुळें नाहीं वाचलात ह्यावरून तुम्हांला विशेष वाटलं त्यांत कांहीं तरी, खरं ना ?

**विजू** : असेल कदाचित् तसं.

**मनोहर** : काय बरं असेल तें ?

**विजू** : ' तें ' कीं ज्यामुळें बुद्धिमान् माणसं वाग्वैजयंतीचा उच्चार ' वैजयन्ति ' करतात ...

**मनोहर** : नि ' तें ' कीं ज्यामुळें ज्ञानेच्छु विदुषी नवे नवे अंक वाचीत नाहींत ...

**विजू** : मग काय बरं ' तें ' ?

**मनोहर** : पोस्टानें आलं म्हणून ' पोस्टिक ' प्रेम असेल कदाचित.

**विजू** : [ निर्विकारपणें ] असेलही !

**मनोहर** : लग्नाची मात्रा त्यावर देऊन त्या ' पोस्टिक ' प्रेमाला आपण पौष्टिक करूं या ना ?

**विजू** : कुणाला ठाऊक हा मदनाचा ' पोस्टिक ' कीं पौष्टिक गुलकंद पचवायला मला शक्ति आहे कीं नाहीं ती ?

**मनोहर** : [सावरून] कुणीं सांगावं ? बरं आतां आपण काम करूं या. नाहीं तर अशा गप्पांनीं ' तरुण ' चा अपमृत्यु व्हायचा !

* * * *

[ त्यागनाथ व विक्रम सिगरेट्सूच्या धुराचे फवारे सोडीत कोचावर लोळपटत आहेत... ]

**त्यागनाथ :** भाई आहेस ना तूं ?

**विक्रम :** व्हॉट् डु यू टॉक् ?

**त्यागनाथ :** तसं नव्हे रे. भरीव कार्यकर्ता आहेस, कीं उगाच आपला शिरा ताणून बडबडणारा सोंगाड्या आहेस ?

**विक्रम :** आय् पिटी यू. तुला कल्पना नाहीं माझ्या कार्यांची. मुंबईच्या साऱ्या लेबर मूव्हमेंटचं सुकाणूं माझ्या हातांत होतं ... ह्या, ह्या हातांत होतं.

**त्यागनाथ :** स्प्लेंडिड् ! तुला आणखी कार्य करायचं आहे का ?

**विक्रम :** अरे करायचं आहे म्हणून काय विचारतोस ? माझं सारं जीवनच मजुरांकरतां, त्यांच्या हिताकरतां वाहिलं आहे मीं.

**त्यागनाथ :** धन्य आहे. तुझ्यासारखे हुतात्मे ह्या स्वार्थी जगांत आहेत म्हणूनच दुनिया चालली आहे, बरं का विक्रम. खरंच ! तुझा विक्रम खरोखर प्रचंड आहे. इथें तुला कार्याला भरपूर वाव आहे...

**विक्रम :** यस्, गो ऑन्, गो ऑन्.

**त्यागनाथ :** इथें एक 'तरुण' नांवाचं दैनिक निघतं. आहे आपलं साधारणच, पण त्याचा संपादक आहे मोठा लटपट्या नि बाताड्या. लोकांच्या पैशांवर नि प्रेसमध्यें काम करणाऱ्या कंपॉझिटर्सच्या नि इतर मीनियल स्टाफच्या हलक्या पगारावर लेकाचा गबर होत चालला आहे. [ विक्रमच्या डोळ्यांत त्वेष चढतो. ] महागाई देखील देत नाहीं त्यांना तो पुरेशी.

**विक्रम :** मग ?

**त्यागनाथ :** अरे गाढवा, मग काय ? त्यांना तूं संप करायला लाव. महागाई देत नाहीं म्हणजे काय ?

**विक्रम :** आंतली माहिती देणारा एखादा इसम आहे तुझ्या ओळखीचा ?

**त्यागनाथ :** हो, हो. टाळक्यांना भेट. ह्याच रस्त्यावरच्या शेवटल्या खोलींत राहातात ते. त्यांना सर्व विचार. पहिल्यानें सर्व गुप्त ठेव.

**विक्रम :** आत्तां जातों. मला नको शिकवूं. मुंबईच्या लेबर मूव्हमेंटचं सुकाणूं ...

**त्यागनाथ :** समजलं, समजलं. जा आतां. [ तो जातो. त्यागनाथ सुस्कारा टाकतो. ]

**त्यागनाथ :** ह्या जगांत कुणाचा कधीं व कसा उपयोग होईल तें कांहीं सांगतां येत नाहीं. माझा मित्र खरा. पण तो लेकाचा कट्टा ' भाई ', तर मी वडलार्जित इस्टेट नि देण्याघेण्याचे व्यवहार संभाळणारा एक छोटा कां होईना, पण भांडवलदार. जा लेका विक्रमा ! मुंबईचं सुकाणुं वळवलंस, पण सानपूरला काय दिवे लावतोस ते पाहूं. कुठल्याही दंगलीनें संप यशस्वी होऊन ' तरुण ' नरकांत गेला, म्हणजे मनोहरची पत जाईल, पैसा जाईल, सर्व कांहीं जाईल. नि इतका अन्नुकसानी नि विशेषत: पैशाचं खोबरं झालं, कीं त्याला विजूनें न झिडकारलं तर ती ' मॉडर्न् ' च नव्हे ... [ शीळ वाजवीत वाजवीत पुस्तक वाचूं लागतो. ]

* * * *

[ अंधाऱ्या रात्रीं विक्रम टाळक्यांच्या घरीं जातो. तोंडांत सिगारेट्, आंगांत नेहरूशर्ट् हा पोषाख. शेवटच्या घराच्या मागल्या बाजूला जातो. ]

**विक्रम :** मिस्टर टाळके, अहो टाळके ...!

**टाळके :** कोण आहे ? [ कंदील त्याच्या समोर धरतात. ]

**विक्रम :** माझं नांव विक्रम देशपांडे. फार महत्त्वाचं काम आहे तुमच्याशीं. तुम्ही ' तरुण ' मध्यें नोकरीला आहांत ना ?

**टाळके :** होय. बरींच वर्षं आहें तिथें.

**विक्रम :** बरींच वर्षं आहांत ! नि माफ करा हं, पण दोन खोल्या घ्यायला नाहीं परवडत ?

**टाळके :** अहो पगार अवघा साठ रुपये ! महागाईचे दिवस आहत. ह्या खोलीचंच भाडं देतांना आतड्याला पीळ पडतो ?

**विक्रम :** महागाई किती मिळते ?

**टाळके :** अहो चार नि पांच म्हणजे काय महागाई का ?

**विक्रम :** अन्याय आहे ! शुद्ध अन्याय आहे. तुम्हांला, ' तरुण ' च्या सर्व कामगारांना भरपूर महागाई मिळावी म्हणूनच मी खटपट करणार आहें तुमची मदत घेऊन.

**टाळके :** देव तुमचं भलं करो !

**विक्रम :** प्रॉफिट चांगला होतो का प्रेसला ?

**टाळके :** अहो चांगला म्हणजे काय, अगदीं रगड. पण तुमचा काय संबंध ह्यांत ?

**विक्रम :** जिथें कामगारांचा संबंध तिथेंच माझाही. कामगार-चळवळ मुंबईला माझ्यामुळेंच जिवंत आहे म्हणा ना !

**टाळके :** काय म्हणतां, मुंबईला देखील ?

**विक्रम :** होय मुंबईला देखील !

**टाळके :** मग आतां काय करायचं ?

**विक्रम :** आतां घरीं जाऊन झोपायचं. उद्यां मी तुम्हांला भेटेन.

**टाळके :** भेटा, जरूर भेटा. पण ऑफिसांत नको हं.

**विक्रम :** अच्छा, बहोत अच्छा.

* * * *

[ दिवाणखान्यांत गोपीनाथ, यशोदाबाई, यशवंत व कुंदा भोजनोत्तर दिव्याच्या झुंबराखालीं चांदीच्या डब्यांतील पानं खात आहेत. ]

**गोपीनाथ :** यशवंत, ह्या वर्षी तूं नक्की पास होशील.

**यशोदाबाई :** हो बाई एकदाचा ! पांच मण पेढे शंकराला देईन नि एकवीस सोमवार देखील पाणी नि खडीसाखरेवर करीन मी.

**कुंदा :** मी देखील मैत्रिणींना पार्टी देईन दादा तूं पास झालास तर.

**यशवंत :** तुम्हीं बायरन्‌चा 'पॅश्चर' करून टाकायचा प्रयत्न केलात बाबा, म्हणून इतका वेळ नापास झालों.

**गोपीनाथ ;** त्यांत कांहीं अर्थ नाहीं. बायरन्‌ झाला असतास तर चाळीस रुपड्यांवर राहुला असतास कुठें तरी मास्तर. पुढच्या महिन्यांत 'पॅश्चर' झालास कीं मग काय, शंकर गुदमरून जाईल पेढ्यांच्या भाराखालीं.

**कुंदा :** नि दादा पैशांखालीं.

**गोपीनाथ :** अरे रावसाहेबाचा मुलगा मास्तर का कुठें होतो ? तो डॉक्टर, वकीलच झाला पाहुजे.

**यशवंत :** तुमच्या राक्षसी पतीकरतां तुम्हीं माझा वाङ्मयीन आत्मा चिरडलात...माफ करा बाबा, भावनेच्या भरांत कांहींतरी बोललों.

**गोपीनाथ :** [ जवळ येऊन ] अरे कसली माफी नि कसलं काय ? लहान आहेस तूं अजून, तरुण आहेस. चालायचंच. अग ए, गणूला सांग त्याला थोडी बर्फी नि आंबे घेऊन ये म्हणावं...

**यशोदाबाई :** गणू कशाला ? मीच आणतें.

* * * *

[ टाळक्यांच्या घरीं विक्रम येतो. तोच पोषाख पण चेहेऱ्यांत जास्त आत्मविश्वास. ]

**विक्रम :** टाळके, अहो टाळके.

**टाळके :** या, या, तुमची अगदीं वाट पाहात होतों.

**विक्रम :** गांव छान आहे टाळके, हवाही सुंदर आहे. पण दलित वर्गाची स्थिति पाहिली, कीं...गार पाणी द्या हो जरा.

**टाळके :** विद्याधर, अरेऽऽऽ विद्याऽऽऽ पाणी घेऊन ये जरा.

[ दहा वर्षांचा विद्याधर एका हातांत पाण्याचा पेला व दुसऱ्या हातांत घरीं केलेलें बॅटसारखें फळकट घेऊन येतो. त्याच्या डोक्याची तुळतुळीत हजामत केलेली असते व टाळूजवळ एक खजुरी करपावी तसा केसांचा कप्पा ठेवलेला असतो. ]

**विक्रम:** तुमचा मुलगा वाटतं ? छान आहे ! काय नांव तुझं, विद्याधर नाहीं का ?

**विद्याधर :** होय.

**विक्रम :** नंबर कितवा आहे वर्गांत ?

**विद्याधर :** अठ्ठाविसावा !

**विक्रम :** [ आश्चर्यानें ] काय अठ्ठाविसावा ?

**विद्याधर :** [ अभिमानानें ] होय ना ! अहो मागच्या महिन्याला बत्तिसावा होता. तरी घंटेचे मार्क त्या महिन्यांत तीन वेळां बुडाले म्हणून, नाहींतर पंचविसावा तरी नक्की आला असता.

**टाळके :** उनाड आहे हो कारटं ! दिवसभर ती बॅट् हातांत पाहिजे.

हट्ट धरला होतान् नवी आणा म्हणून. [ जरा लाजून ] तेव्हां काशीराम सुताराकडन आणली करवून जेमतेम.

**विक्रम** : तें राहूं द्या आतां. तुमच्यासारख्या श्रमजीवी लोकांना आपल्या मुलांसाठीं नव्या बॅट्स् विकत घेतां याव्या – दुसऱ्या शब्दांत, त्यांची सांपत्तिक स्थिति सुधारावी–म्हणून आमच्यासारखी कांहीं मंडळी भरीव कार्य करीत असतात. विद्याधर, आणखी एक पेला पाणी आण ... नि सांडलंस पाणी तर घंटेचे मार्क चार वेळां चुकून, नंबर पुढच्या महिन्यांत बत्तिसावर जाईल हं पुन्हा ! तेव्हां काय, तर पर्चेसिंग पॉवर, अहो आपलं द्रव्यबळ म्हणा ना, चांगलं वाढलं पाहिजे. मजूर कांहीं यंत्रं नव्हत. ते देखील रक्तामांसाचीं माणसं आहेत.

**टाळके** : पण लक्षांत कोण घेतो ?

**विक्रम** : लक्षांत कोण घेतो ? लक्षांत घ्यायला लावूं त्यांना – त्या ऐदी भांडवलदारांना. स्वच्छ शब्दांत, सडेतोड भाषेंत, विनंती अर्ज नव्हे, हुकमी अर्ज असा लिहा. [ कागद पुढें करतो. ] त्यावर सर्वांच्या सह्या घ्या. एक महिन्याच्या मुदतीची मुभा आहे त्यांत, तुमच्या संपादकाच्या सोईसाठीं. जर महिन्यानंतर महागाई पुरेपूर नाहीं मिळाली तर...

**टाळके** : तर काय ?

**विक्रम** : संप ! एकदम संप ! सानपूरचा सान नव्हे – मोठ्यांतला मोठा संप ! समजलांत ? उद्यां गुपचुप हा अर्ज तुमच्यांतल्या जरा धीट नि हुषार अशा चार लोकांना तुम्ही दाखवा. ते तयार होतीलच नि द्या लगेच संपाची नोटीस ... लाल झेंड्याचा विजय असो !

**टाळके** : गुढीपाडव्याला अवकाश आहे ना ?

**विक्रम** : च् च् च्; लाल झेंडा कामगारांचा, तुमचा, माझा, आम्हा सर्वांचा.

**विद्याधर** : [ मध्येंच ] लाल गेंड्याचा विजय मर्चेंट असो ऽऽऽ लाल गेंड्याचा विजय मर्चेंट असो ऽऽऽ.

[ सारे खो खो हसतात. ]

* * * *

[ यशवंत छानदार पोषाख करून मंदाला भेटायला येतो. ]

**यशवंत** : काय धोंडू ?

**धोंडू** : जी.

**यशवंत** : त्यागनाथ कुठें आहे ?

**धोंडू** : खेलाया गेलत नव्ह का ?

**यशवंत** : अस्सं ! रावसाहेब कुठें आहेत ?

**धोंडू** : फिराया गेल्याती.

**यशवंत** : नि रावसाहेबीण ?

**धोंडू** : त्या देवाला गेल्याती.

**यशवंत** : [ जरा आनंदुन ] त्या ह्या ?

**धोंडू** : त्या कोन ?

**यशवंत** : त्या आपल्या ह्या ? अरे ह्या, अरे त्या, अरे त्या मंदाबाई ?

**धोंडू** : त्या बी कुठें भाएर गेल्याती.

**यशवंत** : मग तूं तरी कशाला राह्यलास ?

[ धोंडू वेंधळल्यासारखा बघतो. ]

**धोंडू** : जी ! घर संभाळाया.

**यशवंत** : जातों मी.

[ मंदा प्रवेश करते. ]

**मंदा** : बसा, बसा ना.

**यशवंत** : [ आनंदून ] गुड् ! आलांत तुम्ही ? तुमच घर तुम्ही यायच्या आधीं गोलघुमटापेक्षां पोकळ वाटत होतं मला.

**मंदा** : कल्पनेचे ताजमहाल तुम्ही फार सुंदर बांधतां...

**यशवंत** : मार्व्हेलस् ! सुंदर कल्पना ! तुमच्यांतही काव्य आहे.

**मंदा** : हें कळायला तुम्हांला इतका वेळ लागला त्यावरून वाटतं, कीं...

**यशवंत** : [ आशेनें, उमाळ्यानें ] काय वाटतं तुम्हांला ?

**मंदा** : नाहीं, असं वाटतं, कीं तुमचं डोकं, मी नसतांना तुम्हांला पोकळ वाटणाऱ्या आमच्या घरापेक्षांच काय, पण त्याहीपेक्षां खूप पोकळ असणाऱ्या त्या गोलघुमटापेक्षांही जास्त पोकळ असावं.

**यशवंत** : पोकळ आहेत ह्या कल्पना. डोक्यानें विचार करण्याऐवजीं हृदयानें विचार केलात तर सृष्टीचं रहस्य लवकर उमगेल तुम्हांला.

**मंदा :** [ उपहासानें हसते ] बुद्धिवादी शास्त्रज्ञांनीच निसर्गाशीं झुंज दिली आहे आजपर्यंत. काव्याला मी महत्त्व देईन, पण अमुक एका मर्यादेपर्यंत. समजा, कवींना जर सत्ता मिळाली तर हें जग म्हणजे वेड्यांचं प्रचंड इस्पितळ होईल एक !

**यशवंत :** वेडी कल्पना आहे ही ! काव्यमय स्त्रियाही आतांशा इतक्या पुरुषी रुक्षपणानें, व्यवहारी नि शास्त्रीय गप्पा करूं लागल्या आहेत, कीं...कीं वाटतं, अशिक्षित स्त्रियांशीं चार गप्पा माराव्या मजेंत.

**मंदा :** गुड् ! स्त्रियांच्या शैक्षणिक प्रगतीचा तुम्ही नकळत उत्तम गौरव केलात. धोंडू, सरबत आण. कोणत्या रंगाचं हवं तुम्हांला ? गुलाबी कीं हिरवं ? गुलाबी रंगांत प्रणय थय्‌थय् नाचतो, तर हिरव्या रंगांत अक्षय तारुण्याची मजलस चालते. कवि आहांत म्हणून विचारतें. बोला, हिरवं कीं गुलाबी ?

**यशवंत :** वा ! कोडं तर गुलाबी घातलं आहे तुम्हीं. असं करा, एक ग्लास सरबत आणा गुलाबी रंगाचं नि दुसरं आणा हिरव्या रंगाचं. एक ग्लास रिकामं आणवा. त्यांत अर्धं गुलाबी ओता. गुलाबींतल्या प्रणयाचा हिरव्यांतल्या अक्षय तारुण्याशीं मिलाफ झाला, कीं एक ग्लास मला द्या व दुसरा तुम्ही घ्या......

**मंदा :** छान ! हाऊ रोमँटिक् ! पण टेस्ट् बिघडेल ना त्याची ? चांगलं दोन ग्लास सरबत फुकट जाईल.

**यशवंत :** पिटी ! हाऊ अन्‌रोमँटिक ?

**मंदा :** नाहीं, तुम्ही सांगतां तसंच करूं या. धोंडू, इकडे ये. [ धोंडू येतो. ] धोंडू, ऐक. एक ग्लास सरबत गुलाबी तयार कर. आणखी एक ग्लास कर हिरव्या रंगाचं नि एक ग्लास रिकामं आण, बरं का ? लवकर आण.

[ ग्लासें सावरीत धोंडू येतो. ]

**मंदा :** जा तूं आतां. यशवंतराव, तुम्हीच करा ही रंगांची मिसळ.

[ यशवंत त्याप्रमाणें करतो. खूष होतो. तिला एक पेला देतो. आपण एक घेतो. ]

**यशवंत :** मंदाबाई, आयुष्य ह असच बेरंगी आहे.

**मंदा :** आयुष्यांत दोनच रंग नि ते पण प्रणयाचे नि अक्षय तारुण्याचे असायला, आयुष्य म्हणजे कांही ' सिनेमा ' नाहीं यशवंतराव.

**यशवंत** : बेरंगी म्हणजे बहुरंगी, आयुष्य बहुरंगी आहे.

[ दीनानाथ प्रवेश करतो. शेवटचं वाक्य ऐकतो. ]

**दीनानाथ** : काय म्हणालांत डॉक्टर, आयुष्य बहुरंगी आहे असंच ना ?

**यशवंत** : हो असंच.

**दीनानाथ** : राइट् ! आतां हेंच पाहा ना. तरुण होतों तेव्हां औत्सुक्यानें लग्न करायची इच्छा होती. मंदाची आई वारल्यावर दुसरं लग्न जें केलं त्याचं कारण निराळं – केवळ मंदाला नि नाथाला संभाळण्यासाठीं एक बाई हवी म्हणून केलं तें. म्हाताऱ्याला मध्यम वयांत तरुण चाळे सुचताहेत म्हणून खूप टिंगल केली लोकांनीं माझी. पण माझ्या अडचणी मलाच माहीत ! सुदैवानें दुसरी बायकोही वांझ निघाली...

[ कस्तुरबाई – दीनानाथची पत्नी – प्रवेश करते. ]

**कस्तुरबाई** : सुदैवानें वांझ निघाली काय ? मुलांचा छळ चुकला तुमच्या ! हे परमेश्वरा, मला मरूं दे. भूत होईन मी नि त्यांच्या सर्व घराचं निसंतान करीन.

**दीनानाथ** : राक्षसिणी, गप्प बैस ! डॉक्टरांच्या समोर...

**कस्तुरबाई** : तुम्हीं मला राक्षस केलंत. गरीब कुटुंबांत दहा माणसांत वागलेली मी. तुमच्यासारख्या वाकलेल्या माडाशीं लग्न करतांना पूर्ण कल्पना होती मला माझ्या आयुष्याची. दोन कारट्यांना संभाळण्याकरतां बिनपगारी ठेवलेली हक्काची दाई त्याखेरीज माझी किंमत तुमच्या घरांत राहाणार नाहीं हें मला माहीत का नव्हतं ! होतं मला माहीत तें, पण माझ्या गरीब माहेराला – माझ्या गरीब भावंडांना तुमच्या श्रीमंतीची मदत होईल म्हणून मी जाणून बुजून स्वार्थत्याग केला नि माझ्या मुलांप्रमाणेंच तुमच्या मुलांना वागवीन अशी वडलांजवळ शपथ घेऊन घराबाहेर पडलें मी. त्याप्रमाणें वागूंही लागलें ... सवतीचा संसार आयता मिळावा म्हणून किंवा चैनींत दिवस काढतां येतील म्हणून नाहीं मी तुमच्या इथें आलें. तुमच्या राक्षसी, संशयी वृत्तीनें मला वेड लागायाची पाळी आली. नाथा-मंदाचं जेवण तुम्ही तपासून पाहूं लागलांत. दैव तुमच्या बाजूचं होतं. मी वांझ निघालें पण त्याचा डंका तुम्हीं गांवभर पिटीत सुटावं ना ? शंकराची मनोभावानें पूजा भक्ति करून काय फायदा ? हे श्रीशंकरा, आजपयत तुला पंचपाळ्यांतून हळद, कुंकू वाहलं...आज, आज हें... !

[ भिंतीवर सहज हात पोचावा म्हणून खालीं टांगलेल्या शंकराच्या तसबिरीवर, कस्तुरबाईनें फेकलेलें पंचपाळें दोहोंपैकीं एका सरबताच्य। पेल्यावर आपटून ग्लास फुटतें. यशवंत, मंदा उठतात. कस्तुरबाईना मूर्च्छा येते. त्यांना सावरतात. ]

**दीनानाथ** : आयुष्य बहुरंगी आहे !

* * *

[ गोपीनाथांचा दिवाणखाना. गोपीनाथ, यशोदाबाई, कुंदा, यशवंतची वाट पाहात बसलीं आहेत. ]

**कुंदा** : भूक लागली. अजून नाहीं दादा येत.

**गोपीनाथ** : येईल इतक्यांत आतां. कुठें गेलाय् तो ?

**यशोदाबाई** : विजयकरांकडे. देवळांत भेटल्या होत्या आज कस्तुरबाई.

**कुंदा** : काय म्हणत होती ?

**यशोदाबाई** : काय म्हणणार डोंबलं ?

**कुंदा** : कां ?

**यशोदाबाई** : दुःखी माणसं कमी बोलतात कुंदा.

**गोपीनाथ** : झालंय् काय तिला दुःख ? खायला आहे, प्यायला आहे, शालू आहेत उंची. शिवाय नवरा रावसाहेब आहे.

**यशोदाबाई** : त्याला काय सरीसारखा गळ्यांत अडकवायचा आहे थोडाच ? पोर नाहीं, बाळ नाहीं, सत्तेचा संसार नाहीं. प्रेमाचं माणूस नाहीं, माणसाचं प्रेम नाहीं. कठीण काम जगणं म्हणजे. खरंच, बिजवरांना दिलेल्या बायकांचीं दुःखं त्या बायकाच जाणें. पुरुषांना तर त्याची कल्पना कधीं येणार नाहींच पण इतर बायकांनाही नाहीं यायची ती.

**कुंदा** : कायदा करावा सरकारनें.

**गोपीनाथ** : सरकारनें—म्हणजे गव्हर्न्मेंटनें ?

**कुंदा** : हो, हो ! गव्हर्न्मेंटनेंऽऽ

**गोपीनाथ** : [ कावराबावरा चेहेरा करीत ] काऽऽऽय ? काय कायदा करावा ?

**कुंदा** : कायदा असा करावा, कीं बिजवरांनीं विधवेशींच लग्न केलं पाहिजे.

**गोपीनाथ** : नि कुणीं कायदा मोडला तर

**कुंदा :** नवऱ्यामुलाला, त्याच्या बापाला नि नवरीच्या बापाला किंवा कुणाही लग्न जमविणाऱ्या वडीलधाऱ्या माणसाला दहा वर्षं सक्त मजुरी ...

**गोपीनाथ :** शंकर, शंऽकर, शंऽऽकर !

[ यशवंत प्रवेश करून ]

**यशवंत :** शंकर फुटला असता, ग्लास फुटलं.

**गोपीनाथ :** ग्लास फुटलं ? ग्लासभर प्यायलासं कीं काय आज ?

**यशवंत :** होय, प्यायलोंय ना. [ यशोदाबाई, कुंदा, गोपीनाथ चेहेरे विस्फारतात.] प्यालों आहें ग्लासभर सरबत...विजयकरांकडे ! त्यांची कस्तुरबाई कांहीं कारणावरनें पिसाळली नि जें तिनें रागानें पंचपाळं भिरकावलं शंकरावर तें चुकून मंदाच्या ग्लासवर लागून चक्काचूर झाला तिच्या शास्त्रीय सरबताचा !

**कुंदा :** शास्त्रीय सरबताचा ? म्हणजे ?

**यशवंत :** तुला नाहीं तें समजायचं. जेवायला वाढा आधीं.

**यशोदाबाई :** पानं तयारच आहेत. तुझ्यासाठीं थांबलों होतों.

**गोपीनाथ :** चला आतां लवकर. क्षुधेनें तृतीय नेत्र माझ्या पोटांत उघडला आहे.

**कुंदा :** गणू, ए गणपति, धावत ये आधीं. ग्लासभर — मोठ्या ग्लासभर — ताक घेऊन ये.

[ गणू जाऊन ताक घेऊन येतो. यशोदाबाई, गोपीनाथ व यशवंत बुचकळ्यांत पडतात. ]

**गोपीनाथ :** हें काय हें ?

**कुंदा :** गणू, तुझं नांव गणपति आहे. तुझ्या हातीनें बाबांना ताक पाज, म्हणजे शंकराच्या कपाळावरनं थेट बाबांच्या पोटांत घरंगळत जाऊन उघडलेला तो तृतिय नेत्र आपणां सर्वांना खाक करून टाकणार नाहीं, समजलास ?

[ गणूला ह्यांतलें कांहींच न समजल्यामुळें तो आलीपाळीनें सर्वांच्या तोंडांकडे पाहात राहातो. ]

**कुंदा :** हत् लेका गण्या ! गुळाचा गणपति म्हणायच्या देखील लायकीचा नाहींस तूं. चला जेवायला !

**गोपीनाथ :** काय हें कुंदे ? देवादिकांची चेष्टा ?

**यशोदाबाई :** नि ती पण सोमवारीं ?

**यशवंत :** जाऊं द्या बाबा. आज शंकर खूप भांग प्यायला आहे, त्याचा दिवस आहे म्हणून. चला.

* * *

[ टाळके, विश्राम व भार्गव ह्यांना – छापखान्यांतील दोन साधारण प्रमुख खात्याच्या मुख्यांना – दुसऱ्या रात्रीं आपल्या घरीं बोलावितात. ]

**टाळके :** तुम्हांला बोलवायला कारणही तसंच आहे समजलांत ?

**विश्राम :** सांगा आतां लवकर. जास्त प्रस्तावना नको.

**टाळके :** हें पाहा, आपल्याला पगार फारच कमी आहेत.

**भार्गव :** फार जुनी गोष्ट आहे ही.

**टाळके :** आपल्याला महागाई...

**विश्राम :** जवळ जवळ नाहींच.

**टाळके :** खरं आहे. जवळ जवळ नाहींच.

**भार्गव :** मग ती, रात्रीं तीन गरीब माणसं एकत्र जमलीं कीं आपोआप मिळणार आहे कीं काय ?

**टाळके :** हें पाहा, आपण असा धमकावणीचा अर्ज लिहूं संपादकाला. महिन्याची नोटीस देऊं त्याला, कीं अर्ज सादर केल्यापासून त्यानें नाहीं दिली महागाई तर प्रेस बंद...

**भार्गव :** अक्षर तुमचं नाहीं हें. कुणाची कल्पना ?

**विश्राम :** कुणाची का असेना ? आजपर्यंत आपण अर्ज केले...

**भार्गव :** नि ते कचऱ्याच्या टोपलींत गेले.

**टाळके :** पण त्यांतली भाषा भिक्षुकाची होती. ह्यांत बंडाची नौबत झडत आहे प्रत्येक शब्दांत. उद्यां काय करायचं...

**विश्राम :** उद्यां सर्व कामगारांना ह्याचा अर्थ समजावून द्यायचा......

**टाळके :** पण अगदीं गुपचुप हं......

**भार्गव :** हो अगदीं गुपचुप. संपाची पूर्ण तयारी झाली, कीं बार उडवायचा.

**टाळके :** विश्राम, तुझ्यावर आम्हां सर्वांची भिस्त आहे. तूं धाडशी आहेस.

शिकलेला कमी असलास तरी बुद्धिमान् आहेस नि भाषण देखील करतोस... संपादकाला हार घातला मागल्या दसऱ्याला, तेव्हां तूंच नाहीं का भाषण केलंस ? पैशांचा लोभी आहेस खरा, पण ह्यांत आम्हांला यश मिळवून दिलंस तर सर्वांनाच चार पैसे मिळतील...

**विश्राम :** घाबरूं नका तुम्ही. मी सर्व व्यवस्थित करतों. आतां रात्र फार झाली. जातों आम्हीं.

**टाळके :** थांबा कंदील दाखवतों.

**भार्गव :** नको, नको. घासलेट जपून वापरा...

**विश्राम :** चांदणं छान पडलं आहे. स्वर्गांत नाहीं घासलेटचं रेशनिंग !

[ सर्व हसतात. ]

*          *          *          *

[ त्यानंतर कांहीं दिवसांनीं. यशवंत व विक्रम दोघेही पास झाल्याची तार येते. विक्रम अजूनही त्यागनाथाच्या घरींच संपाची तयारी करण्यांत गुंग असतो. कल्पनेपेक्षां त्याला पूर्वतयारीला जास्त वेळ लागतो. रा. गोपीनाथच्या घरीं... ]

**गोपीनाथ :** यशवंता, अरे यशवंताऽऽऽ तूं पास झालास. [ त्याला मिठी मारून ] डॉक्टर झालास तूं !

**यशोदाबाई :** पावला एकदाचा शंकर ! अहो पाहातां काय ? पांच मण पेढ्यांची आर्डर द्या पाहूं पहिल्यांदा. एकवीस सोमवार उपास करणार मी पाण्यावर व खडीसाखरेवर आतां.

**कुंदा :** आतां मी मैत्रिणींना ग्रॅंड पार्टी देईन.

**गोपीनाथ :** अहो डॉक्टर, आम्ही एवढे आनंदांत नि तुम्ही मात्र नापास झाल्यासारखे दुःखी ! अरे खरंच पास झाला आहेस तूं. ही बघ तार.

**यशवंत :** आनंद काय मानायचा ? मानायचा झाला तर इतकाच आनंद, कीं ह्यापुढें तोच अभ्यास करायचा तरी टळला !

**गोपीनाथ :** यशवंत, काय हें वेड्यासारखं ? किती स्वार्थत्याग केला आहे मीं तुझ्याकरतां आजपर्यंत ! रावसाहेब असूनही फेटा साधा बांधला, जरतारी नाहीं बांधला; कां तर तुझ्याकरतां चार पैशांची बचत व्हावी म्हणून. राहाणी साधी ठेवली. रावसाहेब असून चैन नाहीं नि फंद नाहींत. हिनें देखील...

**यशोदाबाई** : पन्नास तोळ्यांचा चंद्रहार करणार होते मला; पण मीच सांगितलं, नको. कां, तर तुझ्या शिक्षणाकरतां पैसे असावेत म्हणून...आतां हास पाहूं.

**यशवंत** : अरे ! मला ह्याची कल्पना नव्हती !

**गोपीनाथ** : नसायचीच यशवंत. हा दोष चालू जमान्याचा आहे. आई वडलांनीं केलेल्या अतुल स्वार्थत्यागाची नि खाल्लेल्या खस्तांची किंमत ते स्वर्गस्थ झाल्यावर त्यांच्या मुलांना चांगलीच उमगते...

**यशवंत** : बाबा, रागावूं नका !

**गोपीनाथ** : रागावणार नाहीं. आजपर्यंत रागवायच्या ठिकाणीं रागावलों नाहीं नि पुढेंही रागावणार नाहीं. पण ह्या पुढे सांगून ठेवतों... तुझी प्रॅक्टिस चालो न चालो, बायरन्‌चा तुम्हीं पॅश्चर करून टाकायचा प्रयत्न केलात नि म्हणून माझ्या आयुष्याचा घात झाला वगैरे हृदयविदारक शब्द उच्चारणार नाहीं अशी शपथ घे.

**यशवंत** : [ काकुळतीनें ] तुमची शपथ.

**यशोदाबाई** : नाहीं शंकराची.

**यशवंत** : बरं शंकराची शपथ.

**गोपीनाथ** : [ आनंदून ] अहाहा, शंकरा ! सोन्याचा दिवस दाखवलास आज. कुंदे, गणू गेला ना नरोत्तम मिठाईवाल्याकडे.

**कुंदा** : हो, आतांच गेला.

**गोपीनाथ** : आतां तुझा दवाखाना. त्याची सोय पाहायली पाहिजे. फर्निचर, कंपौंडर, छोकरा...

[ विक्रम व त्यागनाथ प्रवेश करतात. ]

**त्यागनाथ** : कॉंग्रॅट्स्‌ डॉक्टर यशवंत.

**यशवंत** : थँक्स्‌ ! कॉंग्रॅट्स्‌ डॉक्टर विक्रम.

**विक्रम** : थँक्स. आधीं भरपूर खायला आण पाहूं यशवंत, आय मीन्‌ डॉक्टर. फार भूक लागली आहे. अभ्यास केला इतकीं वर्षं नि त्या वर्षांत जेवण देखील धास्तावलेल्या स्थितींत जायचं.

**यशवंत** : खरंच बाबा, पण काय रे, तूं आतां प्रॅक्टिस करणार, कीं तुझ्या त्या कामगार चळवळीचं सुकाणूं...

**विक्रम** : गंभीर विषय आतां नकोत...एक्सक्यूज हं. जरा मजा करूं चार दिवस, मग पाहूं. माझ्यावर सध्या एक मोठी जबाबदारी आहे.

**यशवंत** : कसली ?

**विक्रम** : अरे उडवून द्यायचा आहे...

[ कुंदा प्रवेश करते. हातांत मोठा ट्रे. त्यांत बऱ्याचशा बशा. त्यांत बरेचसें खायला. सुंदर पोशाख. दादा पास झाल्याचा चेहेऱ्यावर निर्मळ आनंद. ]

**विक्रम** : जाऊं दे आतां ! आपण जरा मजा उडवूं पहिली. पुन्हा सांगेन केव्हांतरी. बसा ना कुंदाबाई.

**कुंदा** : अहो, मला कुंदा म्हणा वाटल्यास पण कुंदाबाई नका म्हणूं बरं का ?

**विक्रम** : ऑल राईट, कुंदा म्हणूं. आमचं काय जातं ? आजकाल ज्याचं त्याचं चाललं आहे रेशनिंग. दोन अक्षरं वांचवून शब्दांचं रेशनिंग करायला काय हरकत आहे ? काय हो ? पण खायला तुम्हीं इतकं रग्गड आणलं आहे नि तें इतकं झकास आहे, कीं साम्यवादाचा विसर पडत चालला आहे मला.

**त्यागनाथ** : जाऊं दे रे तुझा तो साम्यवाद. काय कुंदा, दिवस किती छान आहे आजचा, नाहीं ? खरंच आनंदाचा दिवस...

**कुंदा** : [ खट्याळपणें ] मग ? खायला आणलं आहे मीं भरपूर...

**त्यागनाथ** : जिभेचे लाड झाले, पण कानांचे...

**कुंदा** : मग ? कानटोपी देऊं का तुम्हाला घालायला ?

**विक्रम** : ब्रिलियंट् ! फार 'विटी' आहांत बुवा तुम्ही !

**यशवंत** : ताई गाणं म्हण पाहूं एक छानपैकीं.

[ कुंदा अळंटळं न करतां कविवर्य तांब्यांची 'घट तिचा रिकामा झऱ्यावरी' ही कविता म्हणते ! 'त्या चुम्बिति नाचुनि जल लहरी' हा चरण म्हणतांना 'चुम्बिति' हा कुंदेनें घोळून म्हटलेला शब्द वारंवार ऐकल्यामुळें विक्रम व त्यागनाथ ह्यांच्यावर झालेला परिणाम धूर्त माणसाच्या तेव्हांच लक्षांत येईल इतका ठळक असतो ! ]

**विक्रम** : फाइन् ! काय छान गातां हो !

**त्यागनाथ** : नि झार काय आहे आवाजाला !

**कुंदा** : [ मिस्किलपणें ] आई ऽऽऽ आणखी दोन ट्रेज लाव, जलदी. इतक्या स्तुतीला कांही मोबदला पाह्यजेच...

[ सारे हसतात. ]

*   *   *   *

[ मनोहरची संपादकीय खोली ]

**मनोहर** : वैजयन्तीबाई, अहो वैजयन्तीबाईऽऽऽ

**विजू** : काय हो ?

**मनोहर** : हा लेख कुणीं पाठवला आहे ? माहीत आहे ?

**विजू** : नाहीं.

**मनोहर** : मला कल्पना नव्हती ! डॉ. यशवंतांनीं दिला आहे. स्वत: घेऊन आले होते. म्हणाले, ' लिहिण्याचा व संपादकांच्या ओळखी करून घ्यायचा छंद आहे मला ! '

**विजू** : अरे वा ! हे डॉक्टर मेडिसिनचे आहेत, कीं लिटरेचरचे ?

**मनोहर** : मेडिसिनचे. भाषा काय सुंदर आहे, आाणि विचारही ! ' तरुण ' माय ' तरुण ' इज लकी. डॉक्टरांसारख्या लोकांचे लेख छापून आले म्हणजे जास्त इभ्रत वाढते ना आपली ! बसा ना.

**विजू** : थँक्स्.

**मनोहर** : कोंडिबा, सिगारेटचं पाकीट आण. परवां तुम्हांला गाणं आवडलं, कीं गप्पा ?

**विजू** : गाणं.

**मनोहर** : [ पुरुषी साधेपणामुळें, तिचा डाव न ओळखल्यामुळें वरमून. ] काय गाणं ? मग हॉलमध्यें कां नाहीं गेलांत ?

**विजू** : तुमच्या शब्दाकरतां.

**मनोहर** : माझ्या शब्दाकरतां ?

**विजू** : [ आवाज बदलून ] होय. नोकरी करतें ना तुमची ?

**मनोहर** : ओ आय् सी ! ऑफिस अवर्संच्या बाहेर तुम्हीं माझी दख्खल बाळगायचं कांहींच कारण नाहीं.

**विजू** : ऑफिस अवर्संच्या बाहेरच तुमची दख्खल जास्त घ्यावीशी वाटते...

**मनोहर :** कशी काय ?

**विजू :** ऑफिसमध्यें मी आजूबाजूला असतांना तुम्ही जरा जपून वागतां—मार्क' केलं आहे मीं—सिगारेट्स् देखील कमी ओढतां.

**मनोहर :** खरं आहे तें. काय असेल तें असो ! तुम्हां स्त्रियांची ' प्रोटेक्टिव्ह मॅटर्नल इन्स्टिंक्ट ...'

**विजू :** यस् ! ती सदैव जागृत असते म्हणूनच पुरुषांचं सारखं ' ग्रॅफ्टिंग् ' होऊन तीं माणसांत जमा होण्यासारखीं तयार होतात.

[ कॉडिबा सिगारेटचें पॅकेट आणतो. घाईघाईनें मनोहर तें टेबलांत कोंबतो. तें न आवडल्यामुळें विजू समजून हसते. ]

**मनोहर :** कां हो हसतां ?

**विजू :** नाहीं उगाच !

**मनोहर :** तरी पण ?

**विजू :** पॅकेट तुम्हीं इतक्या घाईत कशाला आंत कोंबलंत ?

**मनोहर :** तुमच्या शाब्दिक 'ग्रॅफ्टिंग्चा' परिणाम !

[ दोघेंही मनापासून हसतात. ]

* * * *

[ डॉ. यशवंतचा नवा दवाखाना. कोरें करकरीत सामान. छोकऱ्याचा पोषाख नवीन. किडकिडीत कम्पौंडरचा शर्ट कड्क. पहिलाच दिवस. पेशंट्सूची गर्दी पाहून आश्चर्यचकित होतो. नवीन असल्यामुळें सर्वांना नमस्कार करीत आंत जातो. पेशंट्सना आश्चर्य वाटतें, बरें वाटतें. विश्वास उत्पन्न होतो. ]

**एक म्हातारा :** हे नवे डॉक्टर, पाहा किती विनयशील दिसतात ! सर्वांना नमस्कार करीत आंत गेले विचारे...

**एक तरुण :** [ खोकत ] खरोखर मॉडेस्ट दिसतात !

**दु० म्हातारा :** त्यांचे चार्जिसही मॉडेस्ट असतील तर फार बरं होईल बुवा !

**ए० म्हातारा :** [ तरुणाला उद्देशून ] काय हो ? तो फोटो कसला लावला आहे डॉक्टरनें ? तरुण आहांत तुम्ही—तुम्ही बरोबर सांगाल.

**तरुण :** आहें ऐन पंचविशींत पण चाळशीशिवाय कांहीं दिसत नाहीं लांबचं.

**दु० म्हातारा :** ही हल्लींची तरुण पिढी ! नुसते पोकळ लेंगे घालायला सांगा. लेंग्याच्या आंत बांबूसारख्या पायांच्या काड्या, छातीचा अगदीं पडलेला सिम्बल नि मानेवर मांसाचा बटाटा ! कधीं लेकाचे टगेगिरी करतील कीं भरपूर व्यायाम करतील...कोणता फोटो म्हणालांत तुम्ही, तो होय ? तो मला वाटतं चार्लस् डिकन्सचा असावा !

**प० म्हातारा :** नि तो ?

**दु० म्हातारा :** तो शेक्सपिअरचा फोटो नाहीं, पण चित्र आहे तें.

**प० म्हातारा :** नि तो ? त्याच्याच बाजूचा ?

**दु० म्हातारा :** अहो ते आपले राम गणेश गडकरी...!

**प० म्हातारा :** हो, हो ! म्हणजे आपले 'एकच प्याला' वाले नाहीं का ? आलं लक्षांत.

[ यशवंत बाहेर येतो, बाहेर जायच्या तयारींत. बरोबर छोकरा. छोकऱ्याबरोबर बॉक्स. ]

**डॉ० यशवंत :** जरा व्हिजिटला जाऊन येतों...जरा थांबा हं.

[ सारे पेशंट्स् माना डोलावतात. ]

*   *   *   *

[ अंधारी रात्र. टाळक्यांचें घर. टाळके, विश्राम, भार्गव व विक्रम कंदिलाभोवतीं बसले आहेत. त्यांच्या बाजूला विद्याधर, त्याची चिमुरडी बहीण व त्या दोघांची आजी – टाळक्यांची आई – पहुडलेली आहे. ]

**विक्रम :** अर्जावर सर्वांच्या सह्या झाल्या ?

**विश्राम :** अगदीं झाडून सर्वांच्या. सह्या नाहींत, त्यांचे आंगठे उठवले आहेत नि त्यापुढें त्यांचीं नांवं घातलीं आहेत.

**विक्रम :** छान ! उद्यां असं करायचं, विश्राम व भार्गव, तुम्हीं दोघांनीं मनोहरच्या रूममध्यें नेहमींप्रमाणेंच जायचं नि गलका वगैरे न करतां अर्ज टेबलावर ठेवून परतायचं. तो विचारील, कसला अर्ज ? तुम्ही जरा घुश्शांतच सांगा, 'वाचून पाहा ना !'

**विश्राम :** हो, अगदीं बरोबर ! गोड शब्दानें काम होत असेल तर पहिल्यापासूनच कशाला झकाझकी ?

**भार्गव :** इतकं करून नाहीं वळला लेकाचा, तर दाखवूं त्याला इंगा... लाल झेंड्याखालीं जमलेले कामगार रक्त सांडल्याशिवाय राह्यचेच नाहीत.

**टाळके :** खरोखर डॉ. विक्रम, तुम्ही देव आहांत. आमच्यासारख्या कुटुंबवत्सल माणसांची आजकाल इतकी केविलवाणी स्थिति झाली आहे, की त्यची पूर्ण कल्पना यायला पदरांत चार पोरंबाळंच हवींत. महागाई मिळेल तर...

**विक्रम :** अहो मिळेल म्हणजे काय, मिळालीच पाह्यजे! कामगार हे आतां पूर्वींचे नाहीं राह्यले. गरीब जनता ही अजूनही पूर्वींसारखीच पैशानें जरी गरीब असली, तरी भयंकर झुंज एकोप्यानें द्यायची शक्ति त्यांच्या शरीरांत आतां हैदोस घालीत आहे, क्रांतीसाठीं हैदोस घालीत आहे. हा लाल झेंड्याचा प्रताप!

**टाळके :** नि तुमचा विक्रम...

* * * *

[मनोहरच्या ऑफिसांत. भार्गव व विश्राम अर्ज घेऊन त्याच्या खोलीकडे जात असतांना इतर सर्व लोक त्यांच्याकडे थोड्या आश्चर्यानें —जास्त भीतीनें—पाहात आहेत. टाळके फार कामांत असल्याचा बहाणा करताहेत पण मान मधून मधून उंचावून चोरून पाहाताहेत.]

**विश्राम :** [टेबलावर अर्ज ठेवीत] आमची निराशा होणार नाहीं अशी खात्री आहे.

**मनोहर :** निराशा? कशाबद्दल?

**भार्गव :** वाचून पाहाल तर बरं होईल. त्यांत सर्व कांहीं आहे...

**मनोहर :** पण आहे काय प्रकरण?

**विश्राम :** वाचून पाहाल तर......

**मनोहर :** तो पाहीन हो! पण आहे काय भानगड?

**भार्गव :** महागाईसाठीं अर्ज.

**मनोहर :** [जरा पुसट धक्का बसल्यासारखा होतो, पण लगेच स्वतःला सावरून] ओ आय सी! इतकंच ना? अच्छा! विचार करूं त्याचा.

**भार्गव :** सुविचार करा हं पण!

[दोघे जातात.]

* * * *

**मनोहर** : वैजयंतीबाईऽऽऽ

[ ती येते. पार्टिशनच्या अर्धवट उघडलेल्या दारांतून तिची अर्धीच डोकावणारी मूर्ति व त्यामुळें सहजगत्या प्रसवलेला चेहेऱ्यावरचा मिस्किलपणा जास्तच प्रकर्षानें दिसतो. तिच्या चेहेऱ्यावर 'आम्हांला माहीत आहे काय गम्मत झाली ती' असा भाव विलसत आहे. ]

**मनोहर** : कम् इन्, कम् इन् ! हें पाह्यलंत का ?

**वैजयन्ती** : वाचलं देखील...नि सही सुद्धा केली आहे !

**मनोहर** : यू टू ब्रूटस् !

**वैजयन्ती** : भांडवलवाले 'ब्रूट्स्' सारखे वागायला लागले, म्हणजे कामगारांना — मला देखील — सह्या कराव्या लागतात.

**मनोहर** : गुड् ! सानपूरच्या हवेंतही फरक पडूं लागला तर !

**वैजयन्ती** : जागतिक युद्धापेक्षांही जास्त प्रभावी अशा सुप्त शक्ति साऱ्या जगतांत आज भडकल्या आहेत. ह्या महायुद्धामुळें भडकल्या आहेत नि त्याच अखिल विश्वाचं नि साऱ्या जनतेचं भवितव्य ठरविणार आहेत.

**मनोहर** : [ थोड्या उपहासानें ] महायुद्धानें तुमच्यांतल्याही सुप्त शक्ति जाग्या झालेल्या दिसतात. त्याचं पर्यवसान कशांत होईल माहीत आहे ?

**वैजयन्ती** : [ रोख न समजून ] कशांत ?

**मनोहर** : तुम्हीही एक क्रांति कराल !

**वैजयन्ती** : क्रांति ? कसली क्रांति ? एक व्यक्ति क्रांति करूं शकत नाहीं. एक व्यक्ति क्रांति घडवून आणते...

**मनोहर** : तुम्ही करणारी क्रांति एकाच व्यक्तीची आहे...लग्न कराल तुम्ही !

[ हॉ-हॉ-हॉ करून हसतो. बोलण्याचा रोख जरा 'लाइट' गोष्टीकडे वळल्यासारखें वाटून वैजयन्तीही त्यांत सामील होते. ]

* * * *

[ डॉक्टर यशवंत कस्तुरबाईंना पाहायला आलेले असतात. ]

**मंदा** : [ पेशंटच्या कॉटपाशीं ] बाबांचं आमच्या कांहींतरीच ! त्या दिवसापासून आई जी आजारी पडली......

**डॉक्टर** : म्हणजे केव्हांपासून ?

**मंदा :** शंकराऐवजीं ग्लास—रंगीत ग्लास—फुटल्यापासून.

**डॉक्टर :** नि औषध कुणाचं चालू होतं ?

**मंदा :** अहो तो बुड्ढा वैद्य—धन्वंतरी वैद्याचं !

**डॉक्टर :** धन्वंतरी वैद्याचं ? मग गुण यायलाच पाहिजे !

**मंदा :** मग तुम्हांला कशाला बोलावलं असतं ? बाबांचा आहे त्याच्यावर विश्वास पण माझा नि दादाचा नाहीं. आम्ही दोघांनीं आणलं तुम्हांला, अर्थात् बाबांच्या संमतीनें.

[ डॉक्टर रोग्याला तपासतात. ]

**डॉक्टर :** कंडिशन् जरा 'ॲनिमिक' झाली आहे. काळजी घेतली पाहिजे. भिण्यासारखं कांहींच नाहीं पण डोक्याला फाजील ताण पडल्यामुळें मूळचा अशक्तपणा जास्त वाढला आहे. औषध पाठवून देतों. कोण येतं आहे बरोबर ? त्यागनाथ ?

**मंदा :** तो गेलाय् कोर्टावर.

**डॉक्टर :** आणि बाबा ?

**मंदा :** ते गेले आहेत कोर्टात. 'इंटरेस्टिंग' केस आहे म्हणे आज. मीच यत तुमच्या बरोबर.

**डॉक्टर :** [ आनंदून ] चला ना, टांगा आहेच खालीं.

**मंदा :** टांगा परत पाठवा. आमच्या कार' मधून जाऊं आपण. 'फ्री' नेईन तुम्हांला !

**डॉक्टर :** ऑल् राईट, स्वीट ड्रायव्हर !

**मंदा :** [ चपापते ] काय म्हणालांत ? स्वीट ड्रायव्हर ?

**डॉक्टर :** बरं असं म्हणतों. ऑल राईट ड्रायव्हर, कम् ऑन...

**मंदा :** [ गमतीनें हसते ] यस् सर !

*   *   *   *

[ गाडींतून डॉक्टर व. मंदा दवाखान्याकडे येत असतात. सुंदर दुतर्फी झाडी व सिमेंटचा रस्ता. झोंबणारा वारा. त्यामुळें वाटणारी मजा. मंदाचा पदर उडून डॉक्टरांचें तोंड झाकतो. मंदा बाजूला पाहाते आणि हसूं दाबीत लक्ष नाहीं असें दाखविते. ]

**मंदा** : काय हो डॉक्टर ? हा कसला रंग ?

**डॉक्टर** : [ पदर बाजूला सारीत ] हा ना ? हा गुलाबी...

**मंदा** : छट्, हिरवा. अक्षय तारुण्याची झडप असते पदराच्या झडपांत !

**डॉक्टर** : तें खरं, पण गुलाबी प्रणयाचा हळुवारपणा देखील नाहीं का त्याच्या स्पर्शांत ?

**मंदा** : हाऊ व्हेरी पोएटिक् ? तुमच्या सुंदर कल्पना ऐकतां ऐकतां स्टिअरिंग व्हीलवरचं लक्ष तुमच्या प्रत्येक शब्दाकडे जाईल नि एखाद्या घराचं नाहीं तर भिंतीचं अवजड पंचपात्र ह्या मोटारच्या ठिकऱ्या, परवांच्या त्या रंगीत ग्लासाप्रमाणें करील.

[ दोघेंही हसतात. दवाखाना येतो. ]

*　　　*　　　*　　　*

[ दुपारची वेळ. टाळक्यांच्या घरीं त्यांची वृद्ध मातोश्री बनीचा परकर शिवीत बसली आहे. ]

**काशीबाई** : इतके चार टाके झाले, कीं पडेन जरा. म्हातारपणांत होतंय् कुठें काय ? सारा जन्म कष्टांत गेला. नि कष्टाळू माणसं दीर्घायुषी असावीं असा नियमच नाहीं का जगाचा ? नाहीं बसवत...जरा पडतेंच आतां...

[म्हातारीचा डोळा लागतो. कडक उन्हामुळें झोपेपेक्षां ती एक ग्लानीच असते जवळ जवळ. पडतां पडतां काशीबाई ती लांबलचक सुई निऱ्यांत खोवून पडते. विद्याधर बॅटचें फळकूट फलकावीत जो धावत येतो, तो आजीच्या आंगावर तिला उठविण्यासाठीं एक झेप टाकतो. त्याच्या गुडघ्यांत ती सुई जाते...त्यासरसा तो मोठ्यानें किंकाळतो. ]

**विद्याधर** : जिजीऽ ऽ ऽ ! आईऽ ऽ आईगऽ ऽ ऽ

[ काशीबाई उठतात. त्याला मांडीवर घेतात. रक्ताची धार लागलेली असते. शेजारीपाजारी जमा होतात. सुई आंत जाऊन मोडलेली असते. वरचा तुकडा कोणीतरी ओढून काढतो. ]

**एक शेजारी** : डॉक्टर आणा, डॉक्टर आणा.

**काशीबाई** : कसला डॉक्टर ? गरीबांचा डाक्टर वर असतो...तो 'फी'नाहीं घेत. थांबा, विद्या ! त्याच्यावर मी कांदा-हळद तळून बांधतें. बरं वाटेल तुला मग...

[ शेजारी : पण आजीबाई, डॉक्टर...वर

काशीबाई : जास्त वाटलं तर संध्याकाळीं आणूं

[फाटक्या चादरीवर कण्हत पडलेला विद्या. त्याच्या शेजारीं घाबरून गप्प राहिलेली त्याची धाकटी बहीण, आजारी असल्यामुळें विद्यानें दिलेलें बॅटचें फळकट संभाळीत आहे. कांदा व हळद विद्याच्या पायाला लावून गंभीर चेहेरा करून बसलेली काशीबाई.]

काशीबाई : शंकरा, एकवीस सोमवार करीन नुसत्या पाण्यावर... खडीसाखर खाल्ली असती, पण त्यापुरतेही पैसे नसावे इतक्या सतत दारिद्र्यांत आम्हांला ठेवून, कडक व्रत करवून घ्यायची हौस फेडून घेतली आहेस ना तूं आम्हां गरिबांमार्फत ?

* * * *

[ संध्याकाळ : टाळके, विश्राम व भार्गव छापखान्यांतून गप्पा करीत करीत परतत आहेत.]

टाळके : काम तर अगदीं झकास झालंय्!

भार्गव : अहो, होणारच !

विश्राम : की लेकाचा झाला चाट् !

टाळके : बहुतेक कांहीं तरी होईल...

भार्गव : असं वाटतंय्.

विश्राम : नेभळट आहांत ! होणारच.

टाळके : तुम्हां आम्हांला जवळ जवळ वीस पंचवीस रुपये महागाई मिळेल. आहांत कुठें ?

विश्राम : हो, खरं आहे !

टाळके : पहिली विद्याला नवी बॅट आणीन. बनीला नवीन फ्रॉक, मातोश्रीला नवीन लुगडं आणायचं किती महिने म्हणतोंय्, तेंही आणीन......

भार्गव : नि तुम्हांला ?

टाळके : शर्ट नवीन करायला नाहीं परवडणार, पण बारा आण्यांचा गंजिफ्रॉक घेईन म्हणतोंय् !

[ टाळक्यांचं घर येतं. ]

**टाळके** : [ खुषींत ] अच्छा! राम राम! विद्याऽऽ ऽऽ ए विद्याऽऽऽऽ! अग बनेऽऽऽ ए बनेऽऽऽऽ! विद्याऽऽऽऽऽऽ, तुला नवीन बॅट आणणार मी आतां...बने, तुला झगझगीत फ्रॉक, नि आई, तुला लुगडं. हें...हें काय? विद्याऽऽऽ काय हे?

**काशीबाई** : सुई गेली त्याच्या पायांत. पडलें होतें दुपारीं मी. डोळा लागला माझा चुकून. त्यानें जी झेप टाकलीन् आंगावर माझ्या ती नेमकी निऱ्यांत खोवलेली सुई गेली त्याचा गुडघ्यांत. काढली शेजारच्या बापूनें, पण पाय फार ठणकतो आहे. डॉक्टरला आण आतां.

**टाळके** : आतां आणतों. महागाई मिळणार आहे.

*   *   *   *

[ 'तरुणा'च्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सची सभा. तीन गुजराथी, दोन पारशी, एक मद्रासी व मनोहर असे, 'यू' आकाराच्या टेबलाभोवतीं बसले आहेत. छापखान्यांतला गबाळेपणा येथें नाहीं. टेबलावर फ्लॉवर पॉटस वगैरे... ]

**मनोहर** : आज मीटिंग आठ दिवस लवकर बोलवायचं कारणही तसंच आहे. तें महत्त्वाचं नसेल कदाचित, पण चिंताजनक खास आहे!

**एक पारशी** : अरे पन् छेऽऽ सुंऽऽऽऽ?

**मनोहर** : आम्हांला चाळीस टक्के महागाई भत्ता मंजूर केला नाहीं तर आम्ही संप करूं...

**दु० पारशी** : एम्? एम्? मारा बाऽऽऽप!

**प० पारशी** : आय लंडन् टाईम्स छे एम् जेवी मने लागे छे!...

**मद्रासी** : [ रेंकत ] ऑऽऽर, मद्रास हिंदूऽऽऽ!

**प० गुजराथी** : एम केम बने! मंगाई केटली थयेली छे...एटलुं बध्धूं आपवानूं केम परवडशे?

**मनोहर** : पण आपण पेपरच्या किंमती नाहीं का वाढविल्या?

**दु० गुजराथी** : तारे शु थयुं? दस टका मंगाई तो पेल्लिच आपेली छे!

**ति० गुजराथी** : तारे पछी?

**प० पारशी** : तारे पछी तुम्ही असा करा मनोहर...मी सांगते तुम्हांला. असा ढोंग तो बंबईमंदी आमी लई ज्योएला हाय! तेच्यामधीं काय हाय, कीं

आपल्या प्रेसमधला एक दोन माणस...ते संपाच्या पुढारी असेल तो लय च्यांगला...नाहीं तो तेपक्षीं जरा हलका [ त्याचा हलकेपणा दाखविण्यासाठीं फ्लॉवरपॉट उचलतो ] माणसला घरीं बोलवा तुमी !

**मनोहर** : [ रोख न उमगून ] ते कशालाऽऽ ?

**प० पारशी** [ उपहासानें हसुन ] तद्दन घाटी लोक तुमी ! अरे त्येच्या हातमंदी एक दोन हिरव्या नोटा दिला म्हणजे ते घाटी असा खुस होवून जायेल कीं संपबिंप खलास. दरेक महिना दोन चार हजार मंगाई जादा द्यायची ते पासुन हें बरा नाय काय ?

**प० गुजराथी** : अगदीं बराबर ! असाच करा तुमी. हं ! जेवढ · खर्चो होएल तेवढा सँक्शन् !

**सर्व** : हां, हां ! ' सॅन्क्शंड '

**पहिला पारशी** : नि मंगाई देऊन बी फायदा नाय त्या लोकला ! जादा पैसा कमावला कीं ते दारू खायेल,...ताडी पियेल, तमाशा करेल, नि काम बी बराबर नाय करणार......

**पहिला गुजराथी** : बराबर बराबर, ! दोन वखत लई खाणारा घाटी काम बराबर नाय देते ! त्येला थोडा भूकेंऽऽऽ ठेवलाच पायजे !

**मनोहर** : [ बटलरला खुण करतो. ] भूक लागली असेल सर्वांना आतां !

**पहिला पारशी** : हाँ, ए बात चोक्कस !

[ फळफळावळ, कॉफी वगैरे पदार्थ टेबलावर येतात. ]

**मनोहर** : मी काम करतों बराबर. दोन चार हिरव्या नोटांनीं कुणाचेही डोळे पांढरे होतील !

* * * *

[ डॉक्टर यशवंतच्या घरीं टाळके धावत येतात. चेहेऱ्यावर घर्मबिंदु चमकतात बिचाऱ्याच्या. धापा टाकताहेत ते. ]

**टाळके** : डॉक्टर, अहो डॉक्टर...

**डॉक्टर** : काय हो ? काय झालं ? पांडू, बॅग नि टांगा आण लवकर... तो बघ समोरून चाललाय्...

**टाळके** : अहो, माझ्या विद्याच्या गुडघ्यांत सुई गेली आहे. उपटून बाहेर काढली ती...पण आंत थोडा तुकडा मोडून राहिला असावासा वाटतो. डॉक्टर,

चला हो लवकर! माझा विद्या एकच आहे...फी देईन तुम्हांला मी...म्हागाई मिळणार आहे आम्हांला!

**डॉक्टर:** पेशंट तळमळत असतांना फीविषयीं कुणी बोललेलं मला नाहीं आवडत. पैशाचं काय एवढं?

**टाळके:** असेच सर्व डॉक्टर असतील तर...

[ टांग्यांतून डॉक्टर व टाळके जातात. ]

* * * *

[ त्यागनाथाच्या घरीं. त्यागनाथ व विक्रम. ]

**त्यागनाथ:** मला वाटलं होतं तुझ्यांत 'डॅश्' आहे.

**विक्रम:** मग आतां काय वाटतं?

**त्यागनाथ:** आतां वाटतं ती तुझ्यांत तितकीशी नाहीं!

**विक्रम:** कशावरून म्हणतोस हें?

**त्यागनाथ:** अरे, कशावरून कशावरून काय? इतके दिवस झाले, तुझ्या संपाचा कांहीं पत्ता? कसला तूं संप घडवून आणणार? पाणी जोखलं मी तुझं... म्हणे मुंबईच्या लेबर मूव्हमेंटचं सुकाणुं...[ वेडावून ] ह्या...ह्या हातांत होतं! इतकंसं सानपूर...इथें फार दिवे लावलेत!

**विक्रम:** कांहींतरी बडबडून, लावलेले दिवे तूं निरर्थक बडबडण्याच्या फुंकरीनें विझवीत मात्र आहेस. पूर्ण काम झाल्याशिवाय मी याची वाच्यता करीत नसतों. अरे, इथले मजूर मुंबईच्या मजूरांएवढे सेल्फकॉन्शस नाहींत...अडाणी ते...त्यांना कळत नाहीं. म्हणून वेळ लागतो आहे, समजलास?

**त्यागनाथ:** [ समाधान वाटून ] ओ आय् सी! तुझा 'मास सायकॉलॉजीचा' अभ्यास दांडगा दिसतोय्!

**विक्रम:** तुझ्या 'बायकॉलॉजीच्या' अभ्यासापेक्षां तो खचीत कमी असेल!

* * * *

[ डॉक्टर मंदाच्या आईला आणखी एक 'व्हिजिट' देत आहेत. ]

**डॉक्टर:** ह्यांचा रोग जास्त मानसिक आहे.....

**मंदा:** मग काय करावं आम्ही?

**डॉक्टर:** चांगल्या हवेच्या ठिकाणीं ठेवाल तर बरं होईल. बदल पाहिजे

यांना. [ दुसऱ्या खोलींत जात जात ] इथले बरेचसे लोक मानसिक रोगानें पछाडलेले दिसतात.

**मंदा :** [ चपापून, सावरून ] कोण कोण ? ते कसे ? सांगा पाहूं डॉक्टर.

**डॉक्टर :** गंमत म्हणून सांगतों ...

**मंदा :** गंमत म्हणूनच सांगा...

**डॉक्टर :** तुझ्या फादरना कोर्टांत जाऊन केसिस ऐकायचा मानसिक रोग जडलाय् ...

**मंदा :** हं, पुढें ?

**डॉक्टर :** तुझ्या आईला, रुक्ष संसाराचा वीट येऊन वैवाहिक कोर्टानें जन्मठेपेची शिक्षा, वेदीवर, देवाब्राह्मणांसमक्ष ठोठावल्यामुळें तिला तो मानसिक रोग जडलाय्...

**मंदा :** हं, पुढें ?

**डॉक्टर :** तुझ्या दादाला टेनिस कोर्टांचा...

**मंदा :** नि मला ?

**डॉक्टर :** त्याचं ' डायग्नोसिस् ' नक्की झालं नाहीं अजून !

[ मंदा धूर्तपणें हसते. डॉक्टर समजून हसतात. ]

★ ★ ★ ★

[ संध्याकाळीं पुलाच्या कठ्यावर कांहीं पेन्शनर मंडळी हवा खात असतात. त्यांत आपले गोपीनाथ, दीनानाथ व वैजनाथ ही त्रयी आहेच. ]

**दीनानाथ :** बागायतीची तक्रार ह्या पंपांनीं अगदीं दूर केली आहे आजकाल...

**गोपीनाथ :** हो, बरी आठवण झाली !

**वैजनाथ :** कसली ?

**गोपीनाथ :** काय म्हणालांत ? पंप नाहीं का ? पंपांनीं बागायतीची तक्रार दूर केली असेल पण ' तरुण ' च्या संपानें ह्यापुढें आपल्या बौद्धिक बागायतीची तक्रार चालू होणार असा रंग दिसतोय् आजकाल...

**दीनानाथ :** काय म्हणतां ?

**वैजनाथ** : 'तरुण' मध्यें संप होणार आहे असं विजू सांगत होती... महागाईच्या प्रश्नावर! तिनें देखील सही केली आहे अर्जावर.

**गोपीनाथ** : बाकी कांहीं म्हणा, तुमची विजू 'रेव्होल्यूशनरी' खरी!

**वैजनाथ** : अहो कसली आली आहे 'रेव्होल्यूशनरी?' लहान असतांना घेऊन तिला फिरवायचा मी, तेव्हां वाऱ्यानें उडलेले धुळीचे कण आंत जाऊं नयेत, म्हणून इवले इवले हात ती आपल्या लहानग्या डोळ्यांभोवतीं नाचवायची, त्याची स्पष्ट आठवण आहे मला अजून!

**गोपीनाथ** : पाह्यलंत? इतक्या लहानपणीं देखील तिनें निसर्गाशीं झुंज दिली होती...म्हणूनच म्हणतों मी तिला रेव्होल्यूशनरी!

**दीनानाथ** : पण ही एकाएकीं संपाची वावटळ...

**गोपीनाथ** : वास्तविक विजूनें पुन्हा एकदा आपले आतां मोठे झालेले हात डोळ्यांवर धरून ह्या वावटळीपासून स्वतःचा बचाव करावा, नाहीं का?

**वैजनाथ** : नाहीं. तिनें आतां ते डोळे पूर्ण उघडले आहेत.

**दीनानाथ** : खरंच! दुनिया बहुरंगी आहे!

* * *

[ मनोहरचें घर. रात्रीं ९ चा सुमार ]

**मनोहर** : सखाराम, ए सखाराऽऽऽम.

**सखाराम** : काय?

**मनोहर** : विश्रामच्या घरीं जा नि त्याला घेऊन ये. वाटेंत कुठें थांबायचं नाहीं. हे घे टांग्याला पैसे.

**सखाराम** : व्हय् जी.

**मनोहर** : नि हें बघ, येतांना टांगा टाळक्यांच्या घरावरून आण नि त्यांनाही घेऊन ये. अगदीं लवकर हं.

**सखाराम** : व्हय् धनी.

**मनोहर** : दारूच्या कोठाराला मशाल लावणाऱ्या विघ्नसंतोषी माणसाला जो राक्षसी आनंद होत असेल, त्याचा अनुभव येतो आहे मला. टाळके ऑफिसांत येत नाहींत त्यांचा मुलगा फार 'सीरियस्' आहे म्हणून! बिचारा टाळके! तो नक्की पैशांच्या अडचणींत असेल. हिरवी नोट पाह्यली, कीं त्याच्या

टाळक्यांत नवीन विचार लागलीच येतील. स्वत:करतां नाहीं तर मुलांकरितां तरी... विश्राम नाहीं नीट वळला तर टाळक्याची नोट त्याला बहुतेक वळवीलच...अरे हो! पण असं काय करतों मी? हा लेकाचा विश्राम... पक्का लोभी आहे तो. छापखान्याचं सामान चोरून वापरून नथूजवळून 'कंपोज' करून घेऊन हा लेकाचा कित्येक लोकांना थोड्या भावांत कुंकुमपत्रिका वगैरे छापून देतो बाहेरच्या बाहेर हें माझ्याच नव्हतं का कुणींतरी कानांवर घातलं? यस्, यस्, राइट! अगदीं करेक्ट!

[मनोहर खुषींत गाणें म्हणतो. तें संपतांच बेल वाजवून, टाळके दबकत व विश्राम धिमेपणानें असे येतात.]

**मनोहर** : यावं, यावं! बसा, बसा ना!

[सर्व कोचावर बसतात. टाळक्यांना कोचावर कसंतरी वाटतं... विश्राम ओळखतो, कांहींतरी डाव आहे.]

**मनोहर** : सखाराम, थंडगार पन्हं घेऊन ये तीन ग्लास. हं! काय टाळके, कसा आहे तुमचा छोकरा?

**टाळके** : जास्त 'सीरियस्' आहे. कसं होणार काळजी पडली आहे. सेप्टिक् होईल कदाचित्...

**मनोहर** : [खोट्या भावनेनें] अरे, अरे, अरे! गरीब बिचारा!

**टाळके** : त्याची विवंचना, पैशाची विवंचना! अगदीं कांहीं विचारूं नका. डॉक्टर यशवंत म्हणाले, हॉस्पिटलमध्यें—त्यांच्याच हॉस्पिटल वार्डमध्यें—ठेवा म्हणून...पण ठेवायचा कसा?

**मनोहर** : मी सांगतों तुम्हांला कसा तें. विश्राम, नीट ऐक. [दरडावून] तूं नीट ऐकावंस हें जास्त श्रेयस्कर आहे...नाहींतर महागाई नाहींच, पण नोकरी जाऊन शिवाय कैदेंत जावं लागेल तुला.

**विश्राम** : [आवेशानें] कां म्हणून?

**मनोहर** : कां म्हणून? नथूला हाताशीं धरून, छापखान्यांतलं सामान चोरून वापरून, कित्येक लोकांच्या आमंत्रणपत्रिका, कुंकुमपत्रिका, व्हिजिटिंग कार्ड्स् कोण छापतं? नि ही ज्यांबिसगिरी करून पैसे कोण खातं? तूं खातोस... माहीत आहे मला...पुरावा आहे माझ्याजवळ...

**विश्राम** : [ उसन्या आवेशानें ] पण...

**मनोहर** : [ किंचाळून ] पण...? पण काय ? तुझी सारी इज्जत पणाला लावलीस तरी तुझ्या बेड्या चुकणार नाहीत !

[ विश्राम खचतो. टाळके 'आ' वासून पाहातात. ]

**विश्राम** : [ दीनवाणीनें ] चूक झाली माझी. क्षमा करा मला.

**मनोहर** : [ हेटाळणीनें हसून ] अरे वा ! म्हणे क्षमा करा ! लिमिटेड प्रिंटिंग प्रेस आहे, कीं लिमलेटच्या गोळ्यांचं छोटं दुकान आहे ?

**विश्राम** : तुम्हीं नाहीं सोडवलंत मला ह्यांतून तर लिमलेटच्या गोळीएवढी अफू खावी लागेल मला !

**मनोहर** : जरा सबूर ! क्षमा केली तुला तर सांगेन तसं करशील ?

**विश्राम** : [ आनंदानें ] बंदा गुलाम !

**मनोहर** : टाळके, तुम्हींही लक्षपूर्वक ऐका. तुम्ही दोघे आतां आमचे आहांत, आमच्या गटांतले आहांत.

**टाळके** : नाहीं...होय, नाहीं...होय.

**विश्राम** : बावरूं नका असे. आहोंत आम्ही तुमच्या गटांतले.

**मनोहर** : दॅट्स गुड् ! टाळके, विद्या 'सीरियस' आहे तुमचा. ही हिरवी नोट असूं द्या तुमच्याजवळ...असावी आपली. [ टाळके थक्क होतात. अपेक्षित परिणाम झालेला पाहून मनोहर पुढें बोलतो. ] परत नाहीं करायची ! तुम्ही आतां आमचे ना ?

[ कृतज्ञतापूर्वक टाळके बघतात...विश्रामही तसाच पाहातो. ]

**मनोहर** : विश्राम...

**विश्राम** : [ लाचारीनें ] काय ?

**मनोहर** : ही तुला ठेव. [ शंभराची नोट त्याला देतो. विश्राम आनंदतो. ] पण काय रे विश्राम ! ह्याच्या पाठीमागें कोण आहे ?

[ टाळके व विश्राम एकमेकांकडे पाहातात. ]

**मनोहर** : अरे असे पाहातां काय ?

**विश्राम** : विक्रम देशपांडे नांवाचे एक डॉक्टर आहेत. मजुरांकरतां प्राण टाकतात म्हणे. त्यागनाथाच्या घरींच असतात ते. त्यागनाथांनीच त्यांना पाठवलं असावं...

**मनोहर** : काय ? त्यागनाथांनीं ?

**विश्राम** : होय, त्यागनाथांनीं.

**मनोहर** : [ सर्व प्रकार झटदिशीं लक्षांत येऊन ] ओ आय सी ! आय सी दि गेम् नाऊ ! बरं, .तुम्हीं आतां जा...रात्र बरीच झाली आहे. उद्यां ९ वाजतां मला इथें भेटा, मग बोलूं. टाळके, तुमच्या छोकऱ्याला यशवंतरावांच्या हॉस्पिटल-मध्यें ताबडतोब पाठवा. पैशाची काळजी करूं नका...मी आहें ! डॉक्टर माझेही मित्र आहेत. विश्राम, टाळक्यांना शक्य तों मदत कर इतर...अच्छा, जा आतां !

* * * *

[ टाळके व विश्राम विद्याला उचलून टांग्यांत ठेवीत आहेत. त्याच्या बॅटचें फळकूट त्याच्या हातांत लोंबकळत आहे. त्याची आजी, बनी वगैरे पाहात आहेत. ]

**विद्या** : बरं झालं पायांत सुई गेली म्हणून !

**टाळके** : कां रे बा ?

**विद्या** : म्हणून तरी टांग्यांत बसायला मिळालं !

[ टाळके तोंड वळवितात. त्यांच्या डोळ्यांना चटकन् पाणी येतें व ते आवंढा गिळतात. ]

* * * *

[ टांगा दवाखान्याजवळ थांबतो. स्वत: डॉक्टर सामोरे येतात. ]

**डॉक्टर** : मनोहरपंतांचा आतांच मला फोन आला होता मिस्टर टाळके, कीं आपण येणार म्हणून.

**टाळके** : अहो, अशीं देवमाणसं आहेत म्हणून आमच्यासारख्या लुळ्यापांगळ्यांचा निभाव लागतो आहे, नाहींतर...?

[ पुन्हा विद्याला उचललें जातें. तो कण्हत असतो. ]

**डॉक्टर** : आतां कांहीं काळजी करूं नका.

**टाळके** : तुमच्या नजरेखालीं सतत राहील, तेव्हां...

**विश्राम** : नि शिवाय डॉक्टर आपलेच आहेत !

**विद्या** : डॉक्टर, मला लवकर बरा करा. आमच्या वर्गाची ' सेकंड बी ' बरोबर मॅच आहे पुढच्या शनिवारीं. ' स्कोअरर ' आहें मी तिथें !

**डॉक्टर** : [ त्याला खुष करण्याकरितां कांहींतरी संभाषण चालू ठेवण्याच्या उद्देशानें ] काय '[illegible]अररक़' ? तुला नाहीं खेळायला घेतला ?

**विद्या** : मीं खेळतों चांगला...अगदीं कॅप्टन्‌पेक्षां चांगला खेळतों. पण आमचा कॅप्टन् म्हणाला, कीं तुझी पांढरी पँट् नाहीं म्हणून तुला नाहीं घेणार आम्हीं टीममध्यें !

[ पुन्हा टाळके मान फिरवितात. त्यांचा हात नकळत त्या शंभराची नोट असलेल्या खिशाकडे जातो. ]

**टाळके** : [ आवेगानें ] विद्या, आतां आणतों तुला पांढरी पँट् नि नवी बॅट् !

**विद्या** : आतां काय उपयोग ? आतां एखादे वेळीं डॉक्टर माझा पाय देखील कापतील गुडघ्यापासून. डॉक्टर, माझा पाय नका हं कापूं ! मला क्रिकेट् खेळायचं आहे. बरा झाल्यावर बाबा मला नवी बॅट् आणतील नि पांढरी पँट् सुद्धा... परवडलं, तर त्यांना सांगेन पांढरे बूट् आणा रबरी...

**टाळके** : [ उमाळा येऊन ] आणीन...पांढरे बुट् आणीन...

**विद्या** : पॉलिशच्या ऐवजीं चुलींतली पांढरी राख लावीन मी त्यांना...ती खूप आहे आमच्याकडे...

[ पुन्हा टाळके मान फिरवितात. ]

**डॉक्टर** : थांब विद्या, किती बडबड ?

**विद्या** : थोडं राह्यलं आहे आतां डॉक्टर ! मग पांढरा शर्ट्, पांढरी पँट्, पांढरे बूट नि नवी बॅट घेऊन जाईन मी...आमचा कॅप्टन् मला टीममध्यें घेईल... डॉक्टर, तुम्ही पण या बाबांबरोबर ती मॅच पाह्यला.

**डॉक्टर** : जरूर येईन बरं बाळ ! आतां मला तपासूं दे पाहूं !

[ डॉक्टर त्याला तपासतात. त्याच्या पायाचा 'एक्स् रे' घेतात. सुईचा बारीक कणाएवढा तुकडा, कोठेंतरी डकलेला त्यांना आढळतो. ]

**डॉक्टर** : ऑल् राइट ! पडून राह्यचं हं विद्या.

[ दुसऱ्या खोलींत जातात. टाळके व विश्राम त्यांच्या पाठीमागून जातात. ]

**टाळके** : काय आहे डॉक्टर ?

**डॉक्टर** : एक दोन दिवसांत ऑपरेशन् करावं लागेल...केलंच पाहिजे.

**विश्राम** : नाहीच का चुकवतां येणार ऑपरेशन् ?

**डॉक्टर** : आतां चुकवलं तर मोठें ऑपरेशन करावं लागेल...

**टाळके :** मोठं ऑपरेशन्? कशाचं?

**डॉक्टर :** अहो, पायच कापून काढावा लागेल ना गुडघ्यापासुन! मग कसली पांढरी पँट, पांढरा शर्ट नि पांढरे बूट...पांढरे करील डोळा बिचारा. [ स्वगत ] नि मग सर्वच पांढरी राख... चुलींतल्या राखेसारखी!

**टाळके :** [ घाबरून ] लवकर करा ऑपरेशन्...आतांच करा ना! एकच आहे विद्या माझा...मठ्ठ असो, कसाही असो, पण माझा नव्हे का तो मुलगा?

[ लहान मुलासारखे विश्रामच्या कुशींत रडूं लागतात. ]

**डॉक्टर :** तुम्ही नका हो घाबरूं! सर्व कांहीं व्यवस्थित होईल...तेवढी बॅट वगैरे मात्र आतांच आणून त्याच्या उशाजवळ ठेवा म्हणजे बरं वाटेल त्याला... फार नाद दिसतोय् क्रिकेटचा...

**टाळके :** अहो लेकाचा झोपेंत सुद्धा बडबडतो 'आमच्या ३१ रन्स तुमच्या २८.' पानं आणायला गेला माझ्याकरतां तर रस्त्यांतून बोलिंग करीत येतो!

**डॉक्टर :** अरेरे, काय हा नाद! आतां आणा बॅट, पँट्, शर्ट्, बूट...

**टाळके :** चल विश्राम, आत्तां आणूं या सर्व...

* * * *

[ डॉक्टर कस्तुरबाईंना पाहायला येतात. ]

**डॉक्टर :** हाऊज् दि पेशंट?

**मंदा :** गॉन्!

**डाक्टर :** [ धक्का बसून ] गॉन्?

**मंदा :** गॉन् टु माथेरान! हवा पालट करण्याची कल्पना आईला नि बाबांनाही पसंत पडली...कालच गेले ते.

**डॉक्टर :** गुड्! आतां बऱ्या होतील. माथेरानच्या थंड हवेंत त्यांचं पटेलही चांगलं...आय ॲम् वरीड!

**मंदा :** कां?

**डॉक्टर :** एक सीरियस् केस आहे माझ्याकडे.

**मंदा :** तरुण छोकरी आहे वाटतं सुंदर?

**डॉक्टर :** हाउ स्टुपिड? क्रिकेटवेडा दहा वर्षांचा छोकरा आहे. त्याचा पाय कापावा लागेल कीं काय अशी धास्ती वाटते.

**मंदा :** डॉक्टर घाबरट नसावे.

**डॉक्टर :** घाबरायचा प्रश्न नाहीं. पहिलंच आहे ऑपरेशन्...कॉम्प्लिकेटेड आहे. शिवाय....

**मंदा :** तुम्हांला यश येणारच त्यांत. यशवंत आहे तुमचं नांव...खरंच डॉक्टर, तुमचा धंदा फायदेशीर म्हणायचा, कीं लोकोत्तर ?

**डॉक्टर :** तें डॉक्टरच्या स्वभावावर अवलंबून राहील. कांहीं डॉक्टर खाटीक असतात तर कांहीं सत्पुरुष असतात. एक गोष्ट मात्र खरी, कीं त्यांच्यांत काव्य वगैरे जर का असेल तर दिवसेंदिवस तें झुरणीला लागून मरतं !

**मंदा :** तुमच्या कल्पनेला नि काव्याला वाळवी लागली वाटतं ?

**डॉक्टर :** तसं झालंय् थोडं. रक्त नि मांस सारखं हाताळल्यामुळें स्पर्शेंद्रियं बधिर झालीं आहेत...सिगरेट ओढून देखील गंमत वाटत नाहीं. उत्कट काव्य वाचलं, तर आनंद वाटत नाहीं. उत्कृष्ट गद्य वाचलं तर डोकं दुखायला लागतं...

**मंदा :** व्हॉट ए हॉरिबल् लाइफ् !

**डॉक्टर :** नॉट् सो हॉरिबल् ! गोरगरिबांची सेवा करायला मिळते.

**मंदा :** अहाहा, महात्मा कीं मोहात्मा ? पैसे नाहीं वाटतं घेत त्यांच्याकडून टिच्चून ?

**डॉक्टर :** घेतों, नाहीं असं नाहीं. पण केवळ पैशाकरतांच कष्ट करतों असं मात्र नाहीं. बरं, अच्छा ! गप्पा फार रंगतात आपल्या !

**मंदा :** नि त्या काचेरी नसल्यामुळें रंगीत ग्लासाप्रमाणें फुटत देखील नाहींत.

**डॉक्टर :** फुटाव्या अशी तुमची इच्छा आहे का ?

**मंदा :** असंच कांहीं नाहीं अगदीं.

**डॉक्टर :** वेल्, चीरियो !

* * * *

[ मनोहर डॉक्टर विक्रमला घेऊन डॉक्टर यशवंतरावांच्या हॉस्पिटल-मध्यें येतो. टाळके व विश्राम तेथें असतातच. ]

**मनोहर :** हॅलो डॉक्टर, विक्रमला आणला आहे तुमच्या मदतीकरतां. ऑपरेशन् तुम्ही दोघे झटकन् उरकाल !

**डॉक्टर यशवंत :** ओ ! थँक्स मनोहर, यू हॅव्ह ब्रेन्स .

**मनोहर** : गुड् ! [ डोक्यावरून हात फिरावितो.] [डॉ. यशवंत डॉ. विक्रमना पेशंट दाखविण्याकरितां आंत नेतात. ] टाळके, तुम्हीं ९ वाजतां येणार होतां विश्रामबरोबर...जमेल तेव्हां या. तुम्हीं दोघेही रजेवर असल्यामुळें तिकडे त्या बाबतींत कांहीं चळवळ नाहीं अगदीं. !

[ डॉक्टर यशवंत एक्स रे बाहेर उजेडांत आणतात. मनोहर वगैरे तेथें असतात. ]

**डॉ. यशवंत** : विक्रम, हा पाहिलास ? हाच तो छोटा कण...कसा चिकटून बसलाय् अगदीं !

[ टाळके वगैरे गर्दी करतात. आपल्या मुलाच्या पायाच्या हाडाचा फोटो पाहून टाळक्यांना रडें कोसळतें. ]

**टाळके** : विद्या, आजपर्यंत तुझा हौसेनें कधीं फोटो काढला नाहीं. जो पहिलाच फोटो पाहिला तो तुझ्या पायाच्या हाडाचा ! [ मोठ्यानें रडूं लागतात. ]

**विक्रम** : रडूं नका टाळके. डॉक्टर, आपण झटकन् ऑपरेशन् उरकून घेऊं. लोकेट्' झालाय् तो कण...आतां वेळ नको.

**डॉ० यशवंत** : केव्हां करायचं ?

**विक्रम** : मला वाटतं परवां.

**डॉ० यशवंत** : अच्छा ! परवां. ठरलं, परवां.

* * * *

[ ती चांदणी रात्र आहे. त्या रात्रीं यशवंत मंदाच्या घरीं जातो. दिवसभरच्या श्रमामुळें त्याला कोठेंतरी जाऊन गप्पा कराव्याशा वाटत असतात. ]

**यशवंत** : काय वाचतां आहां ?

**मंदा** : मार्व्हल्स ऑफ् मॉडर्न सायन्स.

**यशवंत** : माय गॉड् ! चांदणं छान पडलं आहे.

**मंदा** : यस् ! काय ' इंटेन्सिटी ' असेल चांदण्याची ?

**यशवंत** : तुमच्या रुक्षपणाइतकीच असेल.

**मंदा** : घरांत बसून नाहीं उमगत चांदण्याची ' इंटेन्सिटी ' ! चला, आपण बाहेर फिरून येऊं या.

**यशवंत** : छान ! अगदींच रुक्ष नाहीं तुम्हीं !

[ टेकडीवर दोघें बसलीं आहेत. तेथून शुभ्र चांदण्यांत निद्रिस्त भासणारें सानपूर दिसत आहे. ]

**यशवंत** : कां कुणाला ठाऊक, टेकडीवर बसलं, कीं बरं वाटतं.

**मंदा** : गार गार वारा लागून डोकं हलकं होतं म्हणून.

**यशवंत** : हें तर आहेच. पण जगापासून – व्यावहारिक जगापासून – आपण क्षणभर तुटले जातों, ती ताटातूट मला जास्त मनोहर वाटते !

**मंदा** : मनोहर ! 'तरुण'चे संपादक ! संप होणार आहे ना तिथें ?

**यशवंत** : [ त्रासून ] यस् ! सम् सच् थिंग इज् गोइंग ऑन देअर !

**मंदा** : फार महत्त्वाची आहे ती ' थिंग. '

**यशवंत** : कबूल.

**मंदा** : डॉक्टर, तुमच्या कंपनींत कम्फर्टेबल् वाटतं मला.

**यशवंत** : कां ?

**मंदा** : कारण तुम्ही विनयशील आहांत...

**यशवंत** : इतकंच ?

**मंदा** : नि माझ्यांत नाहीं तें तुमच्यांत आहे.

**यशवंत** : काय ?

**मंदा** : बौद्धिक उद्दामपणाचा अभाव ! तुमची बुद्धि त्या चंद्रासारखी शीतल आहे म्हणा ना.

**यशवंत** : [ मिस्किलपणें ] चंद्राची ' इंटेन्सिटी ' वाढत चालली, बरं का.

**मंदा** : [ हिरमुसण्याचा आविर्भाव करीत ] वाढू दे, वाढू दे. काय हरकत आहे ?

**यशवंत** : अहो ' मूनस्ट्रोक ' होईल ना तुम्हांला ?

**मंदा** : ' मूनस्ट्रोक ' होवो नाहीं तर ' हनीमूनस्ट्रोक ' होवो ! तुम्ही आहांत ना डॉक्टर जवळ ?

**यशवंत** : आहें मी जवळ !

[ यशवंत जवळ सरकतो. ती हालचाल करीत नाहीं. तो तिच्या कमरेभोवतीं हात टाकतो. ती हरकत घेत नाहीं. ]

**यशवंत :** मंदाऽऽऽ

**मंदा :** यशवंत !

**यशवंत :** कुठें आहे तो बौद्धिक उद्दामपणा ?

**मंदा :** निमाला तो.

**यशवंत :** नि ' मार्व्हल्स ऑफ् मॉडर्न् सायन्स ? '

**मंदा :** आपणां दोघांचं मीलन हें ' एज ओल्ड् मार्व्हल ' आहे...जुनं तेंच सोनं !

**यशवंत :** गुड् ! चंद्राची ' इंटेन्सिटी ' भलतीच झाली आहे खरोखर ! चल आतां घरीं.

**मंदा :** नो नो ! बसा ना जरा.

**यशवंत :** बऽऽरं, पण थोडा वेळ हं.

**मंदा :** यस् , थोडा वेळ.

**यशवंत :** पण नको आतां. जाऊं या आपण.

**मंदा :** चला तर, उद्यां पण येऊं आपण इथें !

[ यशवंत आश्चर्यानें, आनंदानें, प्रेमानें तिच्याकडे बघतो. ती खालीं मान घालून चालत असते. ]

* * * *

[ ऑपरेशन् रूम...डॉक्टर यशवंत, डॉक्टर विक्रम, नर्सेस. बाहेर विश्राम, टाळके, टाळक्यांची वृद्ध मातोश्री, बनी वगैरे. ]

**यशवंत :** एक शंका आहे विक्रम.

**विक्रम :** शंकाकुशंकांची ही वेळ नव्हे.

**यशवंत :** नो नो. हीच वेळ आहे.

**विक्रम :** व्हॉट् इज् इट् देन् ?

**यशवंत :** ऑपरेशन्च्या आधीं पुन्हा एकदा एक्स् रे काढूं या आपण.

**विक्रम :** [ न समजून ] कशाला ?

**यशवंत :** अरे, सर्क्युलेशननें तो कण शरीराच्या दुसऱ्या भागांत गेला असला तर ?

[ फोटो पुन्हा घेतला जातो. गुडघ्याजवळ पूर्वी जो कण असतो तो बराच खालीं सरकलेला असतो. ]

**यशवंत :** पाहिलंस विक्रम ? लकी बॉय् ! घाई केली असती तर आणखी एक ऑपरेशन् करावं लागलं असतं.

**विक्रम :** माय् गॉड् ! खरंच, उगाच आपण चिरफाड केली असती.

[ विद्याला क्लोरोफॉर्म देत आहेत. नवी बॅट् त्याच्या उजव्या हातांत व जुनी डाव्या अशा लोंबकळत आहेत. 'क्लोरोफॉर्म' घेत असतांना तो ढोरासारखा ओरडतो. ]

**विद्या :** डॉक्टर, डॉक्टर, माझा पाय कापूं नका. माझा पाय नका हं कापूं. बॅट मारीन तुमच्या डोक्यांत. क्रिकेट खेळायचं आहे मला...सेकंड बी...स्कोअरर... पांढरी पँट्, बूट्...शर्ट्, बॅट्, पाय...[ शुद्ध जाते. ऑपरेशन् सुरू होतें. त्याचें किंचाळणें ऐकून टाळके, त्यांच्या मातोश्री व गोंधळलेली बनी बाहेर रडत असतात. ऑपरेशन् रूमच्या बाहेर कांहीं वेळानें दोघेही डॉक्टर्स् येतात. टाळके धावतच जातात. ]

**टाळके :** डॉक्टर, जिवंत आहे ना माझा विद्या ?

**यशवंत :** खुशाल आहे अगदीं...गुंगींत आहे अजूनही...

**टाळके :** पण...पण...गुंगींतच आहे ना ?

**विक्रम :** होय टाळके. आंत जाऊन पाहा वाटल्यास.

**टाळके :** माझा विद्या !

[ आंत धावत जातात. जीर्ण झालेली त्यांची जननी व तडमडी बनी त्यांच्या पाठीमागून लुडबुडत येतात. त्याला प्रत्यक्ष पाहिल्यावर समाधानाचा निःश्वास टाकतात. त्याच्या कपाळावरून हात फिरवितात. म्हातारी सुद्धा आसवें आवरीत तेंच करते. ]

**टाळके :** परमेश्वरा, धन्य आहे तुझी !

**काशीबाई :** एकवीस सोमवार करीन मी आतां पाण्यावर !

* * * *

[ त्या रात्रीं मनोहरच्या घरीं टाळके व विश्राम जातात. ]

**मनोहर :** या, टाळकेमहाराज, या. कसा काय आहे विद्या ?

**टाळके :** दैवानें खैर केली...चांगला शुद्धींत आहे. अशक्त झाला आहे, पण लौकरच सुधारेल.

**मनोहर** : छान, छान! आतां निवान्त गोष्टी करतां येतील, नाहीं का विश्राम?

**विश्राम** : होय ना!

**मनोहर** : मला वाटतं तुम्हीं उद्यांपासून ऑफिसमध्यें यावं...म्हणजे, आपली तुमची हरकत नसेल तर...

**विश्राम** : हें काय सांगणं? उद्यांपासून येणारच. विद्या सुधारत आहे. टाळकेही येतील.

**टाळके** : कांहीं हरकत नाहीं माझी.

**मनोहर** : गुड्! तुमच्या सिन्सिरिटीचं मला कौतुक वाटतं. बरं, तें असो! उद्यां तुम्ही ऑफिसमध्यें गेल्याबरोबर सारे लोक गलका करतील त्याची काय वाट?

**विश्राम** : पहिल्यानें म्हणजे नोटीसची मुदत संपायला चार आठ दिवस अवकाश आहे. तोंपर्यंत त्यांना आम्ही थोपवून धरतों.

**मनोहर** : छे, छे. असं अर्धवट कार्य नाहीं उपयोगी. त्या चार आठ दिवसांत संपाच्या पूर्ण बीमोडाकरतां सुरुंग पेरून ठेवा तुम्हीं.

**विश्राम** : कसे काय?

**मनोहर** : विश्राम, तूं तुझ्या त्या चोरट्या नथूला हाताशीं धर. [ विश्राम मान खालीं घालतो. ] ह्यांतही चार पैसे मिळतील असं सांग त्याला. क्रांतिकारकासारखा फारच जर वाघूं लागला तर प्रेसचं सामान चोरून, तें वापरल्या-बद्दल हातांत बेड्या पडतील अशी तंबी दे त्याला...

**विश्राम** : तें सर्व करीन...पण ह्यांत सुरुंग कुठें आहे तो मला नाहीं उमगत!

**मनोहर** : नाहींच उमगायचा! नथू हाच मोठा सुरुंग आहे समजलास?

**विश्राम** : तो कसा?

**मनोहर** : हें समजण्याची अक्कल तुला असती तर कच्ची चोरी करून सापडला नसतास तूं असा. अरे, नथू आहे ना?

**विश्राम** : होय, आहे कीं!

**मनोहर** : पहिल्यानें त्याला सर्व समजावून सांग. त्याला आपल्या गोटांत घेतला, की...

**टाळके :** त्यानें काय करायचं ?

**मनोहर :** त्यानें कुरकुरीला सुरुवात करायची. लक्षांत घ्या, कीं नथू हा सामान्य मजूर आहे. त्याचं सर्वस्व नोकरीवर अवलंबून आहे. नि अशाच तऱ्हेचे सर्व मजूर छापखान्यांत आहेत.

**विश्राम :** पण त्यानें कुरकुर काय करायची ?

**मनोहर :** ...कीं आपण बुवा संपांत मुळींच भाग घेणार नाहीं. आपल्या पाठीशीं चार बायकापोरं आहेत. त्यांना उपाशी मारायची कांहीं आपली इच्छा नाहीं...

**टाळके :** काय होईल ह्याचा परिणाम ?

**मनोहर :** आजूबाजूचे चार लोक तसंच म्हणूं लागतील. म्हणतील, आम्हांला नाहीं संपाचं वेड जमायचं. कुणी शिष्ट म्हणतील, अरे ह्यांत काय अर्थ आहे ? चांगली नोकरी मात्र विनाकारण गमवाल ! अहो, केवळ 'तरुण' मध्यें नोकरी करतों, म्हणून गांवांत आज आपल्याला किती मान आहे ! अस्सं, आतां आलं लक्षांत ?

**विश्राम :** पूर्ण लक्षांत आलं माझ्या.

**मनोहर :** शाबास ! चोरटा आहेस, पण हुषार देखील आहेस विश्राम. हं, ही नोट ठेव शंभराची. पन्नास तुझे, पंचवीस टाळक्यांचे...

**विश्राम :** [ आनंदून ] नि पंचवीस ?

**मनोहर :** नि पंचवीस नथू चोरट्याचे !

* * * *

[ डॉक्टर यशवंत मंदाला फिरायला घेऊन जायला येतात... अर्थात रात्रीं. ]

**यशवंत :** गुड् ईव्हिनिंग् ' मिस मार्व्हल.

**मंदा :** [ समजून ] हॅलो ! गुड् ईव्हिनिंग मास्टर थीफ्.

**यशवंत :** मास्टर थीफ् ?

**मंदा :** यस् यस् ! उगाच कशाला बतावणी करतां ?

**यशवंत :** हां हां. आतां आलं लक्षांत [ हसतो. तीही हसते. ] काय, आज वाचन बंद वाटतं ?

**मंदा :** होऽऽऽ ! बंऽऽऽद ! आज चाललं होतं मनन.

**यशवंत** : कुणाचं ? माझं ?

**मंदा** : नो, नो ! कालच्या वाचनाचं.

**यशवंत** : ओ, आय् सी !

**मंदा** : फिरायला जायचं ना ?

**यशवंत** : पण तुमच्या मननांत व्यत्यय...

**मंदा** : असं काय हो ? चला ना.

**यशवंत** : चला, आपलं काय ? पण आज दुसरीकडे जाऊं या.

**मंदा** : पुरुषांना स्थिरता कमी असते. कालचं ठिकाण काय वाईट आहे ?

**यशवंत** : तसं नव्हे, पुरुष स्थिर राहाते तर जगाची प्रगति झाली असती का ?

**मंदा** : जाऊं द्या हो ! जग नि प्रगति गेली उडत. काव्यात्मक बोला कांहींतरी.

[ गप्पा करीत टेकडीवर जातात. ]

**यशवंत** : [ बसल्यावर ] आज मी आहें खुषींत. वाटेल तें करीन मी. जीव वांचविला आहे एका कोवळ्या पोराचा.

**मंदा** : खरंच, कसा आहे तो ?

**यशवंत** : छान आहे आतां. तुम्ही...तूं...म्हणाली होतीस, तुम्हांला यश येणारच, यशवंत आहे नांव तुमचं !

**मंदा** : बरं तुमच्या सर्व लक्षांत राहातं !

**यशवंत** : मीं आज कविता केली आहे.

**मंदा** : काय कविता ? म्हणा पाहूं ! काव्यात्मक बोला असं दुसऱ्यांदा सांगतें आहें मी तुम्हांला.

**यशवंत** : म्हणतों, थांब आधीं. प्रस्तावना अशी, कीं माझ्यासारखा एक काव्यात्मक नवरा असतो...

**मंदा** : हं !

**यशवंत** : नि त्याची तुझ्यासारखी एक व्यवहारी नि रुक्ष बायको असते.

[ मंदा त्याच्याकडे रोखून पाहात असते. ]

**मंदा** : बरं मग ?

**यशवंत** : त्यांच्यावर संवादात्मक काव्य आहे हें. आतां म्हणतोंच.

**तो** : नवरत्नांच्या गुंफुनी माळा बांधिन तुझिया गळ्यामधीं

**ती** : जीर्ण जाहलीं पादत्राणें, नवीन आणा मला अधीं ॥

**तो** : चंद्रसूर्य ते तव तेजानें, लाजतील मग निशीदिनीं ।
**ती** : लाज वाटते, वर्ण सांवळा, 'स्नो' हि नसे अपुल्या सदनीं ॥
**तो** : भवतारूं हें नेईन सखये तुझ्यासवें मी पैलतीरा ।
**ती** : नको ! नको ! ओकारी येईल कसें कळेना तुम्हां जरा ? ॥
**तो** : हरिणाक्षी तूं, हरिणी आणीन शकुंतलेसम रमवाया ।
**ती** : हरिणी कशाची, चष्मा आणा दृष्टि जातसे मम वांया ॥
**तो** : अधरामृत सेवीन जणूं कीं संजीवनीचे लघू घट ।
**ती** : 'पेस्ट्' आणखी 'ब्रश' आणवा कशा ही करितां आटापीट ? ॥
**तो** : केशकलापा तुझ्या देखुनी बिळांत नागिणी सरसरल्या ।
**ती** : दिवड जहालें केसांचें मम गंगावन आणा पहिल्यां ॥
**तो** : कमनीय तुझ्या देहलतेला, प्रीतिपुष्प मम येईल ।
**ती** : वेणी कां तुम्हीं आणत नाहीं, श्रीफल शिरींचें होईल ॥
**तो** : काव्य नसे गे तुझ्या अंतरीं, फत्तर कैसी झालीस गे ।
**ती** : धोंडे कळतें तुम्हां, दगड तुम्ही ! रहा आतां तरि जरा उगे ! ॥

[ मंदा खो खो हसत सुटते. काव्य पडून तिला आवडल्यामुळें यशवंत खूष होऊन तिला साथ देतो. ]

**यशवंत** : ए फत्तर, चल ना !

**मंदा** : ए दगडा, उठ ना !

**यशवंत** : प्रणयी युग्मानें इतकी टणक भाषा कधींच वापरली नसेल.

**मंदा** : नि त्यांचं प्रेमही आपल्याइतकं टणक नसेल !

[ सभ्य चंद्र जो ढगाआड लपला तो, तें आलिंगन सभ्यतेला धरून पाहूं नये म्हणून, कीं सभ्यतेला धरून चोरून पाहावें म्हणून लपला, हें कांहीं सांगतां येत नाहीं ! ]

* * * *

[ 'तरुण' च्या छापखान्यांत...... ]

**एक कामगार** : नथू, संप आला जवळ.

**नथू** : खरंच !-तुमचा संप आहे ना ?

**दुसरा कामगार** : म्हंजे ? तुजा बी न्हव का ?

**नथू :** अरे, काय वेड लागलंय् तुम्हांला ? तुम्ही करा संप वाटल्यास. आपण नाहीं त्यांत सामील होणार. चार बायकापोरं आहेत माझ्या पाठीशीं !

**पहिला कामगार :** नि आमी सडेसोट हांव व्हय् ?

**नथू :** तें मला माहीत नाही. माझ्यापुरतं मला ठाऊक आहे.

**दुसरा कामगार :** हत्, भागूबाई लेकाचा !

**नथू :** आहें मी भागूबाई. दुपारची वेळ मोठी कठीण असते...

**एक टाय्पिस्ट् :** [ अर्थात् किडकिडा ] : काय टाळके ? आला, आला, संप जवळ आला !

**टाळके :** अहो, कसला आला आहे संप ?

**टायपिस्ट :** म्हणजे ?

**टाळके :** अहो, हीं तुम्हां तरुण लोकांचीं कामं ! आम्हां म्हाताऱ्यांना तें आतां नाहीं जमायचं. कुटुंबवत्सल मंडळी आम्ही. शिवाय मुलगा...मुलगा सीरियस् आहे माझा. संपाबिंपाच्या भानगडींत पडलों नि नोकरी गेली, तर डॉक्टरांचा ऑपरेशन् चार्जच काय पण मला विकला तरी त्यांची व्हिजिट फी देखील देतां नाहीं यायची ! अहो, तुम्ही आहां ब्रह्मचारी मंडळी. तुम्हांला काय कल्पना ? पण पुत्रप्रेम मोठं कठीण आहे...

**प्रुफरीडर :** काय विश्रामशेट, संप आला जवळ !

**विश्राम :** कोण लेकाचा संप करणार आहे ?

**प्रुफरीडर :** म्हणजे ? तुम्ही तर आमचे म्होरके !

**विश्राम :** तुमच्या आग्रहामुळें मारून मुटकून म्होरक्या झालों होतों मी. विचार केला मीं नि निश्चय ठरला माझा, कीं तें आपलं काम नव्हे. संप कुणीं करावा ?

**भार्गव :** [ प्रवेश करीत, आवेशांत ] अर्थात आपण !

**विश्राम :** हे...हे घ्या आले तुमचे म्होरके !

**भार्गव :** [ आश्चर्यानें ] म्हणजे ? मी नाहीं समजलों !

**विश्राम :** संपाचा नि माझा कांहीं एक संबंध नाहीं असं तुम्हां सर्वांनाच काय, पण संपादकमहाशयांना देखील आम्हीं कांहीं जणांनीं सांगून टाकलं आहे.

**भार्गव :** अरे, काय म्हणतोस काय ?

**विश्राम :** खोटं नाहीं सांगत. मला पांच रुपये, टाळक्यांना तीन नि नथूला दोन असं ' प्रमोशन ' मंजूर केलं मनोहरसाहेबांनीं ! ही बघ ऑर्डर.

[ आजूबाजूचे कामगार थक्क होतात....गलका करतात..." संप नको! संप नको! विक्रम ब्यांबिस आहे...संप रद्द करा...आमचाही पगार वाढवा ..." ]

**भार्गव :** पैशाचा लोभ मोठा कठीण आहे!

* * * *

[ त्यागनाथाच्या घरीं ]

**त्यागनाथ :** विक्रम, संपाला किती दिवस बाकी आहेत ?

**विक्रम :** आहेत चार आठ.

**त्यागनाथ :** होईल ना यशस्वी ?

**विक्रम :** अर्थात्! मी असल्यावर 'फिआस्को ' कधींच होणार नाहीं. मुंबईच्या लेबर मुव्हमेंट 'चं सुकाणुं...

**त्यागनाथ :** दॅट् विल् इ! कामगारांत एकी?...

**विक्रम :** फक्कड ! समजूतदार आहेत ते.

**त्यागनाथ :** टाळके, विश्राम नि भार्गव ?

**विक्रम :** जारीनें करताहेत संपाचा प्रचार.

**त्यागनाथ :** स्प्लेंडिड्! संप यशस्वी झाला तर...

**विक्रम :** अरे झाला तर काय ? झाल्यासारखाच आहे.

**त्यागनाथ :** हा तुझा मोठाच विक्रम म्हणायचा!

**विक्रम :** अरे, हा तर कांहींच नाहीं. मुंबईला...

**त्यागनाथ :** मुंबईकी बला दूर है! मला वाटतं तूं एकदा छापखान्यांत फेरी मारून यावंस नि प्रत्यक्ष पाहावंस सर्व. टाळक्यांना वगैरे कुणालातरी भेटण्याच्या निमित्तानें जा नि अंदाज पाहा कामगारांचा.

**विक्रम :** कांहीं जरुरी वाटत नाहीं मला...

**त्यागनाथ :** डोन्ट् बी कॉकशुअर. जाच तूं. आपण आपल्याकडून 'प्रिकॉशन्' घेतलेली बरी.

**विक्रम :** अच्छा! तुझ्या शब्दाकरतां जाईन...

* * *

[ 'तरुण 'च्या छापखान्यांत. ]

**भार्गव :** वैजयन्तीबाई, संप नाहीं होत आपला.

**विजू :** कां ?

**भार्गव** : कामगारांत एकी नाहीं. आयत्या वेळीं दगा दिला विश्रामनें. टाळक्यांचंही टाळकं फुटलं. साऱ्या कामगारांचा विश्वास क्षणांत उडाला संपावरून. आतां जवळ जवळ तो विषयच बंद झाला आहे.

**विजू** : टाळके, खरं का हें ?

**टाळके** : खरं आहे. डॉक्टर विक्रमसारख्यांना रिकामपणचे उद्योग करायला काय जातंय् ? ढोंगी आहेत डॉक्टर विक्रम !

**विक्रम** : [ प्रवेश करीत ] काय म्हणालांत टाळके ?

[ टाळके शरमतात, बावरतात पण विश्राम बाजू सावरतो. ]

**विश्राम** : अहो डॉक्टर, टाळकेच काय पण मी देखील म्हणतों, कीं तुम्ही ढोंगी आहांत...सारा प्रेस तेंच म्हणतो आहे. तुम्हीं डॉक्टर आहांत. उद्या दवाखाना काढाल. नव्या दवाखान्याचा जम बसावा नि ओळखी वाढाव्या म्हणून तुम्हीं हा बूट काढला आहे डॉक्टर !

**विक्रम** : [ त्वेषानें ] बूट काढून मारीन...

**विश्राम** : नांवाचे विक्रम आहांत पण कृतीचे भेकड आहांत तुम्ही. दवाखाना चालावा म्हणून तुम्हीं केलेलं हें ढोंग सर्वांना आतां माहीत झालं आहे. मजुरांचा कैवार घेतां तर त्यांच्या चाळींत कां राहात नाहीं ? त्या रावसाहेबांच्या कशाला टाकलेल्या पुऱ्या चघळतां ? [ मनोहर प्रवेश करतो. ] साहेब हे ते ! ह्यांनींच संपाची वावटळ उठवली होती.

**मनोहर** : डॉक्टर विक्रम, मला वाटतं तुम्हीं मुंबईला जावं...तुमचं कार्य तिथें कमी अयशस्वी होईल.

[ विश्राम मोठ्यानें हसतो. टाळके साथ देतात, आणि नथू देखील. जवळजवळ सर्वच. विक्रम पाय आपटीत जातो. तो गेल्यावर विजू मनोहरच्या खोलींत जाते. ]

**विजू** : केवढा मोठा विजय तुमचा !

**मनोहर** : कसला आला आहे विजय ? व्यवहार आहे हा !

**विजू** : म्हणे व्यवहार आहे ! काळीज नाहीं तुम्हां लोकांना. फाजील काम करून काळं पडलेल्या मजुरांच्या रक्ताची शाई करायला कमी नाहीं करायचे तुम्ही !

**मनोहर**: भावांत कमी पडली तर त्याला हरकत नाहीं आमची. व्यवहार आहे हा !

**विजू** : म्हणे व्यवहार आहे! काय हें मनोहर? तुमचं नांवच मनोहर आहे का? मघांशी म्हणालें मी, कीं तुम्हांला काळीज नाहीं...तुम्हांला नाहींच दिसत, पण कोणत्याही डायरेक्टरलाही नाहीं दिसत तें ... किंवा तुम्हीं सर्वांनीं आपआपलीं काळिजं एकजुटीनें विकून, आलेल्या रकमेंत प्रेसची गंगाजळी वाढवली असेल. खरंच, काय हें मनोहर! आयुष्यांत तुम्हीं स्वार्थत्याग करायला कधीं शिकणार?

**मनोहर** : [ गंभीरपणानें ] नीट ऐका वैजयन्तीबाई! मजुरांविषयीं मला प्रेम का नाहीं? त्याच्याविषयीं जिव्हाळा का नाहीं? आहे, सर्व कांहीं आहे. प्रेसमधल्या चार कष्टाळू गरीब कामगारांना पांचपंचवीस रुपये मिळवून दिले असते मीं तर त्यांत माझ्या पदरचं का कांहीं जाणार होतं? छट, कांहींच जाणार नव्हतं.

**विजू** : मग?

**मनोहर** : पण मला माहीत होतं. कितीही कंठशोष केला तरी डायरेक्टर्स माझं म्हणणं ऐकायचे नाहीत. शिवाय त्यांच्या दृष्टीनें मी नालायक ठरून माझीही उचलबांगडी त्यांनीं केली असती...माझी नोकरी गेली असती...पैसा गेला असता ...पत गेली असती...नांव गेलं असतं. मध्येंच वाटे, कीं करावा कामगारांकरतां स्वार्थत्याग. पण धीर होईना मला. भेदनीति वापरली नि संपाचा वणवा ह्या सानपुरांत कुणीं भडकवला हें पाह्यलं तों कळलं, कीं...

**विजू** : ...विक्रमनें बंड पुकारलं!

**मनोहर** : नाहीं विजू, विक्रमनें नाहीं...त्यागनाथनें!

**विजू** : (आश्चर्यानें) काय? त्यागनाथनें? शक्य नाहीं. तो स्वतः भांडवलदार आहे...

**मनोहर** : असेल! पण त्यानें तुझ्या व्यक्तित्वाच्या बँकेंत त्याच्या प्रेमाचं भांडवल गुंतवलं नि त्याचं सपशेल दिवाळं निघाल्यावर, माथं भडकल्यामुळें विक्रमच्या भाईपणाचा उपयोग त्याच्या नकळत करून घेऊन हा संप भडकवला होता. हेतु काय, तर त्यामुळें 'तरुण' बंद पडावा, त्याचं त्याच्या प्रेमाप्रमाणेंच दिवाळं निघावं, माझी नोकरी जावी, पैसा जावा, नांव जावं, पत जावी...

**विजू** : पण ह्यांत त्याचा काय फायदा?

**मनोहर** : 'पौष्टिक' प्रेमाला लग्नाची मात्रा देणारा असा एकमीच आहें हें त्याल पक्कं माहीत आहे म्हणून त्यानें आपली भंबेरी उडवण्याकरतां असा डाव टाकला होता. तेव्हां विजू, हा स्वार्थत्याग मी तुझ्याकरतां...केवळ तुझ्याकारतां केला आहे.

व्यक्तिसुखाच्या मार्गे लागण्याचा दोष माझा असेल, पण तो माझाच का आहे ?

**विजू** : आतां आलं सर्व माझ्या ध्यानांत. तुम्हांला हृदय आहे इतकंच नव्हे तर एकच व्यक्ति उचलून धरील इतकं तें नाजूक आहे ! महागाई भत्त्याची मागणी नाकारून, संपाचा बीमोड करून, तुम्हीं पर्यायानें माझाही अपमान केला आहांत.

**मनोहर** : अपमान कसला ? व्यवहार आहे हा !

**विजू** : मी त्याला अपमानच समजतें...कांहींही करून तो महागाई भत्ता मंजूर करून घ्याल तरच मी तुमच्याशीं लग्न करीन.

**मनोहर** : अगदीं नक्की ?

**विजू** : हें घ्या वचन. [ हातावर हात ठेवते. ]

**मनोहर** : छान ! महागाई भत्त्याच्या एका दगडांत तीन पक्षी !

**विजू** : तीन कोणते ?

**मनोहर** : कामगारवर्ग एक, तूं दोन व मी तीन !

**विजू** : थ्री इज् कंपनी, टू इज् नन्.

* * * *

[ त्यागनाथाच्या घरीं ]

**त्यागनाथ** : कसा काय आहे रंग ?

**विक्रम** : बेरंग झालाय्.

**त्यागनाथ** : म्हणजे ?

**विक्रम** : संप होणं शक्यच नाही.

**त्यागनाथ** : मला वाटतच होतं तूं असे दिवे लावशील हें ! [ वेडावून ] म्हणे मुंबईच्या ‘ लेबर मुव्हमेंटचं सुकाणूं ’......

**विक्रम** : कांहींतरी घोटाळा झाला प्रेस्मध्यें चारआठ दिवसांत......

**त्यागनाथ** : कां होऊं नये ? तुम्ही करीत होतां मोठं ‘ ह्युमॅनिटेरियन् वर्क ’... इकडे कामगार मेले तरी त्यांची पर्वा कोण करतो ?

**विक्रम** : हें असं चालायचंच ! सर्वच ठिकाणीं संप यशस्वी झाले असते तर सर्व जगभर मजुरांचंच राज्य दिसलं असतं तुम्हांला आज.

**त्यागनाथ** : त्याची नको धास्ती. तुमच्यासारखे फक्त बोलघेवडे लोक जोंपर्यंत त्यांत कार्यकर्ते म्हणून मिरवीत आहेत तोंपर्यंत कांहीं नाहीं वळायचं.

* * * *

[ वेगांत मोटार चालवीत मंदा डॉक्टर यशवंतच्या घरीं येते. ]

**मंदा :** डॉक्टर, अहो डॉक्टर, कुठें आहेत डॉक्टर ?

**कुंदा :** त्याच्या खोलींत आहे तो, पण......

**मंदा :** असं का ? [ धावत त्याच्या खोलीकडे जाते. ] डॉक्टर, चला ना !

**यशवंत :** कुठें ?

**मंदा :** स्टेशनवर. आई बाबा इतक्यांत येतील. तार आली त्यांची येतों आहों म्हणून. चला आपण स्टेशनवर जाऊं...कपडे नकाच करूं... चला ना असेच ! त्याला काय झालं ?

**यशवंत :** ऑल् राइट् ! चला तर. ( दोघें मोटारींत बसतात. हा सर्व प्रकार कुंदा, गोपीनाथ व यशोदाबाई आश्चर्यानें पाहात असतात...मोटार भुर्‌कन जाते.)

**गोपीनाथ :** काय ग, हें काय नवीन ?

**कुंदा :** नवीन नाहीं, जुनंच आहे. आतां मात्र चाललं आहे उघड !

**यशोदाबाई :** धन्य झाली बाई. आपल्यासारख्या घरंदाज माणसांना—नाहीं म्हटलं तरी नेकजात मराठे घराण्याला—शोभतं का हें ? कांहीं जात, कुळ, धर्म...

**गोपीनाथ :** खलास ! बुडालं सर्व. सरदार हंबीरराव मोहिते माझ्या पाठीमागें लागले हात यशवंतसाठीं...दहावीस हजार हुंडा येऊन त्याचा शिक्षणखर्चेही बाहेर निघाला असता...पण...नि पैशांचं काय एवढं ! पण...ते...ते विजयकर पाठारे प्रभु नि आम्ही मराठे...

**कुंदा :** होऊं द्या त्यांचं लग्न. जग सुधारत चाललं आहे.

**गोपीनाथ :** गप्प बैस...नाहीं तर...

**कुंदा :** नाहीं तर माझं पण लग्न उडवून द्याल हीच धमकी ना ?

* * * *

[ स्टेशनवर गाडी येते. सेकंड् क्लासमधून दीनानाथ व कस्तुरबाई उतरतात. कस्तुरबाई व दीनानाथ टवटवीत दिसत आहेत. ]

**मंदा :** छान सुधारली आहे प्रकृति दोघांची.

**दीनानाथ :** हवा चांगलीच मानवली आम्हांला.

**कस्तुरबाई :** होय डॉक्टर, तुमच्या सांगण्यामुळेंच आम्हीं थारेपालट केला...आभारी आहोंत तुमचे.

**यशवंत :** त्यांत कसले आले आहेत आभार ?

**मंदा :** [ खट्याळपणें ] सासूबाईनीं जावयाचे असे औपचारिक आभार मानीत नाहीं बसूं......

[ दीनानाथ व कस्तुरबाई आश्चर्यानें थक्क होतात. कांहींही न बोलतां मोटारींत बसतात...मोटार बंगल्यापाशीं थांबते.]

**दीनानाथ :** ( चहा घेत ) हें पाहा डॉक्टर, मला ह्यांत नापसंत असं कांहींच नाहीं, पण तुमचे वडील जरा कट्टर सनातनी आहेत.

**कस्तुरबाई :** हो खरंच ! नि तुमचे जरी ते जानी दोस्त असले, तरी त्यांना हें रुचेलच हें कुणी सांगावं ? आमची मात्र कांहीं हरकत नाहीं.

**यशवंत :** नाहीं ना हरकत तुमची ? मग हरकत नाहीं. बाबा, आई मला नाहीं दुखवणार. अच्छा ! बाय्. बाय्!

[ मंदा त्याला दारापर्यंत पोचविते. ]

**मंदा :** पोचवूं का तुम्हांला कारमधून ?

**यशवंत :** मागच्यासारखं फ्री ऑफ् चार्ज् नको. थँक्स ! मोटारींत बसून माझे पाय दुखूं लागले आहेत. चालतच जातों.

**मंदा :** तुमचे बाबा काय म्हणतात तें मला लगेच कळवा.

**यशवंत :** अगदीं लगेच.

* * * *

[ बोर्ड ऑफ् डायरेक्टर्सची मीटिंग. त्याच व्यक्ति.]

**मनोहर :** आजची मीटिंग महत्त्वाची आहे...संप तर ठार मोडला !

**पारशी :** ( तपकीर कोंबीत ) सारी बात !

**मनोहर :** पण मुंबईच्या गिरण्या नि कारखाने आपल्याला अडचणींत आणतील !

**एक गुजराथी :** ते कसा होतो ?

**मनोहर :** त्यांनीं भलतीच महागाई मंजूर केली आहे. तीस तीस नि पस्तीस पस्तीस रुपये महागाई म्हणे...कांहीं मजुरांना तर पगाराच्या दीडपट महागाईच मिळते !

**मद्रासी :** हाउ आर वुई कन्सर्न्ड वुइथ् बॉंबे अलॉवन्स ?

**मनोहर :** वुई हॅव् टु बी कन्सर्न्ड्. पेपर्मध्यें आज तें छापून येतांच पुन्हा नकळत इथें संपाची भाषा सुरू झाली आहे. त्याचं असं आहे, एकानें केलं म्हणजे दुसऱ्याला जोर येतो ! मुंबईच्या मजुरांना इतकी महागाई तर आम्ही

काय पाप केलं आहे, असंच नाहीं का म्हणणार आपले मजूर? म्हणूं लागले आहेत आत्तांच तसे.

**पारशी** : आय् तो चोक्कस सीरियस् बात छे! मुंबईच्या मिलोंवालानीं दिला असल तो आपल्याला बी द्यायला पडल...

**दुसरा पारशी** : हाँ! ये बात खरी!

**मनोहर** : दुसरं असं, कीं चाळीस टक्यांचीच मागणी आहे त्यांची. मुंबईच्या अगडबंब आंकडयाचं भूत इथें झोंबायच्या आधीं मला वाटतं महागाई सँक्शन्' करण्यांत आपला फायदा आहे.

**गुजराथी** : पन् दस टक्का पेल्लां आपेलांच छे!

**दुसरा गुजराथी** : तारे पछी?

**मनोहर** : खरं आहे. पण उद्यां मुंबईप्रमाणें इथेंही तीस पस्तीस रुपयांची मागणी जोरानें नि एकजुटीनें झाली तर 'तरुण'ला क्षयरोग लागेल ना! इथल्या बहुतेक कामगारांचा पगार वीस ते पन्नासच्या दरम्यान आहे. चाळीस टक्यांच्या हिशेबानें त्यांना आठ ते वीस रुपये महागाई पडते. तेव्हां त्यांच्याच शब्दांत त्यांना पकडून त्यांना भत्ता मंजूर करणं आपल्या फायद्याचं नाहीं का?

**पहिला पारशी** : यस्, आमी आमच्या मत देते.

**दुसरा पारशी** : आमी बी...

**पहिला गुजराथी** : ते लोकला खुस करण्याकरतां तो नाय पण पैशानें तें फायद्यामंदी पडते म्हणून आमी बी आमचा मत देते.

**दुसरा गुजराथी** : आम्ही सुद्धा.

**तिसरा गुजराथी** : आमी कसाला नाय मंग?

**मद्रासी** : इन् दि नेम् ऑफ् इडली डोसा आय् ऑलसो व्होट् फॉर् इट्.

**मनोहर** : [ आनंदून ] हें ठीक झालं.

**पहिला गुजराथी** : पण मंजूर कवापासून करायच्या? गेला महिना तो नाय् ना घ्यायच्या?

**मनोहर** : नाहीं नाहीं! योग्य वेळीं मी तें जाहीर करीन. तोंपर्यंत बातमी गुप्त ठेवायची अगदीं.

**पहिला पारशी** : बस्स! अगदीं बराबर. समदा काम झ्याला. आमच्या पेटमंदी अग्यारीपासूनबी लई मोटी आग भडकली हाय्.

**मनोहरः** हां, यस् ! अरे, डिशीस आणा. पहिल्यानें बर्जोरजीशेठच्या टेबलावर ठेवा...मग बाकीच्यांच्या. नाहींतर आग पसरत जाईल...

*    *    *    *

[ गोपीनाथांच्या घरीं ]

**गोपीनाथ** : यशवंत...

**यशवंत** : काय बाबा ?

**गोपीनाथ** : तूं हें काय आरंभलं आहेस ?

**यशवंत** : मघां मोटारींत बसलों ते आम्हीच नव्हे ! देवकंही बसली असं म्हणा ना !

**यशोदाबाई** : काय हें यशवंत...जात पात, कुळाचार...

**गोपीनाथ** : धर्म, संस्कृति, रूढी...

**यशवंत** : [ आवेशानें ] बाबा, आतां मात्र मी गप्प राहाणार नाहीं. शिक्षणाच्या बाबतींत ढवळाढवळ करून मला भलताच कोर्स देऊन, माझं व्यक्तित्व मारल्याबद्दल तुम्हीं गुन्हेगार आहांतच...माझ्या लग्नाचा विचका करण्याचं श्रेय तुम्ही नका घेऊं आतां. आई, पूर्ण विचार करून मी बोलत आहें. तुमच्या मर्जीविरुद्ध देखील मी लग्न करूं शकतों. मग कशाला उगाच डोक्यांत राख घालतां ? माझं लग्न मंदाशींच होईल.

**गोपीनाथ** : तुझी इच्छा ! सुखी असा म्हणजे झालं.

*    *    *    *

[ मनोहरच्या कचेरींत. ]

**मनोहर** : वैजयन्तीबाईऽऽऽ [ ती आंत येते. ] विजूऽऽऽ ! [ ती आश्चर्यानें पाहाते.] बघतेस काय अशी ? तूं आतां माझी आहेस.

**विजू** ; नाहीं, अजून नाहीं...महागाई...

**मनोहर** : मंजूर करवून घेतली मीं.

**विजू** : [ आनंदातिशयानें ] खरं सांगतां ?

**मनोहर** : अगदीं खरं ! पण इतक्यांत कुण्णाला सांगायचं नाहीं. वचन दे पाहूं.

[ ती हातावर हात ठेवते. तो हात पकडतो व सोडीतच नाहीं बराच वेळ.]

**विजू** : इश्श, हें काय ? 'तरुण' चं ऑफिस आहे हें !

**मनोहर :** मी सुद्धा तेंच म्हणतोंय्.

* * * *

[ दीनानाथांच्या घरीं गोपीनाथ, त्यांची पत्नी आणि कुंदा येतात. ]

**दीनानाथ :** यावं, यावं.

**गोपीनाथ :** तुम्ही आतां आमचे सोयरे होणार !

**दीनानाथ :** माझी नाहीं कांहीं हरकत.

**गोपीनाथ :** माझी आहे...पण माझ्या नि हिच्या हरकतीला कोण विचारतो ?

**दीनानाथ :** काळ बदलला आहे...गोपीनाथ, आपण नको का बदलायला ?

[ यशवंत व मंदा प्रवेश करतात. ]

**यशवंत :** बाबा, तुम्ही इथें कसे ?

**गोपीनाथ :** सोयऱ्यांच्या घरीं जाणं येणं नको कां ठेवायला ?

**यशवंत :** [ आनंदून ] अग मंदा, बघतेस काय ? सासूसासऱ्यांना नमस्कार कर तुझ्या !

[ त्यागनाथ व विक्रम प्रवेश करतात. ]

**गोपीनाथ :** शतायु भव !

**यशोदाबाई :** अष्टपुत्रा सौभाग्यवती भव...

**दीनानाथ :** तुम्ही, आम्ही, जुन्या पिढींतल्या सर्वांनीच असा दिवसेंदिवस समजूतदारपणा दाखवला पाहिजे अशा बाबतींत. अहो कसले आले आहेत पाठारे प्रभु नि कसले आले आहेत मराठे ? कुठचे प्रभु नि कुठचे ब्राह्मण ?

**कुंदा :** [ एक चरण गाते. ] ‘ मराठी असे आमुची मायबोली ’...

**दीनानाथ :** बस्स ! मराठी असे आमुची मायबोली ! तुमची आमची भाषा एक, धर्म एक, संस्कृति एक, सर्व कांहीं एक. मग हें जातिभेदाचं स्तोम हवं आहे कशाला ? तुम्ही हिंदु, आम्ही हिंदु !

**गोपीनाथ :** खरंच ! तुम्ही हिंदु आम्ही हिंदु...

**दीनानाथ :** आतां कसं बोललांत !

**गोपीनाथ :** पण दीनानाथ, असं केलं तर ? मला आपलं असं वाटतं हं ! आमची कुंदा तुमच्या त्यागनाथला दिली तर ?

**यशोदाबाई :** नको, नको.

**गोपीनाथ** : गप्प बैस. रावसाहेब आहेत ते देखील. कुंदा नि त्यागनाथ! अगदीं यशवंत नि मंदा इतकाच छान जोडा शोभेल!

**कुंदा** : जोड्यानें मारावा अशीच ज्याची लायकी त्याच्याशीं मला नाहीं लग्न करायचं! [ सर्वांनाच धक्का बसतो. ] लक्षपूर्वक ऐका. त्यागनाथानें वैजनाथांच्या विजूचा अभिलाष धरून, कॉम्रेड विक्रमच्या मदतीनें, 'तरुण' मध्यें संप घडवायचा घाट मनोहरची नाचक्की नि नापत करण्याकरतां, त्यांचा प्रेस बंद पाडण्याकरतां, त्यांच्या नोकरीवर गदा आणण्याकरतां नि त्यामुळें पर्यायानें मनोहर, विनू ह्या दुकलीचीं शकलं करण्याकरतां घातला होता. मनोहरपंतांनीं हें सारं विजूला सांगितलं नि तिनें मला सांगितलं. अशा नीच, दुष्ट नि पापी माणसाच्या सावलीलाही मी उभी नाहीं राह्यची...! एक वेळ मी डॉक्टर विक्रमना देखील पसंत करीन...

**विक्रम** : पण मी एक वेळ सुद्धा तुला पसंत करणार नाहीं. माझ्या मित्राला झिडकारलंस तूं! तुला मी कसा स्वीकारूं? शिवाय तूं भांडवलदाराची मुलगी... कार्यकर्ती सहचरी मला पत्नी म्हणून पाह्यजे.

**त्यागनाथ** : [ कडवट नैराश्यानें ] चल विक्रम, नाहीं तरी मला गरिबाचीच मुलगी पाह्यजे होती. वीट आला आहे मला ह्या ऐतखाऊ लोकांचा. चल, साम्यवादाचा पुरस्कार करीत आपण आपलं आयुष्य कंठूं!

**विक्रम** : छान! कार्यकर्ता सहचर तर आतांच मिळाला! चल जाऊं या आपण.

* * * *

[ मनोहर—विजूचा लग्न समारंभ...कामगारमंडळींची उत्साही लगबग. डायरेक्टर्स वगैरे बडीं धेंडें कोचांवर पसरलीं आहेत. महाराष्ट्रीय गैरशिस्तीच्या कोलाहलांत लग्न लागतें. हार, तुरे, 'काँप्रॅटस्' वगैरे. विश्राम भाषण करण्याकरतां उठतो. सर्व लोक शांत होतात. ]

**विश्राम** : आपल्या धडाकेबाज 'तरुण' दैनिकाचे तरुण संपादक मनोहरपंत नि त्यांच्या अर्थात् तरुण पत्नी विजूताई ह्यांचं मी 'तरुण'च्या वतीनें अभिनंदन करतों नि त्यांना दीर्घायुष्य, संपत्ति नि संतति ह्यांचा भरपूर लाभ होवो असा 'तरुण'च्या वतीनें आशीर्वाद देतों. 'तरुण'च्या लहानथोर कामगार बंधूंनीं मनोहरपंतांवरच्या प्रेमाचं द्योतक म्हणून स्वखुषीनें ही १००१ रुपयांची थैली अर्पण करायची जी किंमती कामगिरी मला दिली आहे ती मी आतां पुरी पाडतों.

[ थैली मनोहरला देतो. टाळ्यांचा कडकडाट. त्या दोघांना हार घालतो व पुष्पगुच्छ देतो. ]

**मनोहर :** [ हार सावरीत ] सन्मान्य डायरेक्टर्स नि माझ्या कामागार बंधूंनो, तुम्हीं दिलेल्या देणगीबद्दल मी अत्यंत आभारी आहें. कष्टाचे पैसे माझ्याकरतां वेंचून नि माझ्यावर सक्रिय प्रेम प्रदर्शित करून तुम्हीं मला ऋणी करून ठेवलं आहांत. पण तें ऋण अल्पश: तरी मी फेडणार आहें. ह्या मंगलप्रसंगीं मी जाहीर करतों, कीं 'तरुण'च्या तमाम उत्साही कामगारबंधूंना ह्या महिन्यापासून, त्यांनीं मागितलेला चाळीस टक्के भत्ता मंजूर झाला आहे.

[ टाळ्यांचा कडकडाट. "मनोहरकी जय ! मनोहरकी जय" वगैरे हर्षोत्फुल्ल आरोळ्या. 'पैशांत बचत आणि कामगार खूष' हें उमगून डायरेक्टर्स एकमेकांकडे पाहून, समजून हसतात. ]

* * * *

[ यशवंत—मंदा विवाह जास्त टोलेजंग प्रमाणांत. पाठारे प्रभु ललनांचे उंची शालू व नेकजात मराठे घराण्यांतील खानदानी, उंची, भरजरीचीं लुगडीं ह्यांचा मिलाफ मोहक, अगदीं अवर्णनीय मोहक दिसत आहे. ]

**गोपीनाथ :** आटपलं बुवा व्यवस्थितपणें !

**दीनानाथ :** शंकराची कृपा.

* * * *

[ दुसऱ्या दिवशीं दुपारचा एकचा सुमार. यशवंत व मंदा सरबत पीत आहेत. ]

**यशवंत :** पुन्हा सरबत !

**मंदा :** होय पुन्हा सरबत ! गुलाबी नि हिरवं !

**यशवंत :** त्यांचा सुंदर मिलाफ...

**मंदा :** टेकडीवरतीं !

**यशवंत :** होय; टेकडीवरतीं आयुष्याचा चषक चवीनें नि मजेनें पिऊं आपण !

**मंदा :** खरंच ! मजेनें नि चवीनें !

* * * *

[ संध्याकाळीं पांचचा सुमार. मैदानावर विद्याधर पांढरी पँट, शर्ट व

बूट घालून आणि नवी बॅट घेऊन खेळत आहे. एकसारख्या धावा काढून त्यानें हैदोस घातला आहे तेथें ! ]

[ संध्याकाळीं साडेसहा...पुलावर बसले आहेत गोपीनाथ, दीनानाथ व वैजनाथ. ]

**गोपीनाथ :** मुलाबाळांचीं लग्न झालीं, कीं आपल्याला जास्त म्हातारं झाल्यासारखं वाटतं, नाहीं ? [ खोकतो. ]

**वैजनाथ :** [ खोकत ] होय, अगदीं खरं आहे.

**दीनानाथ :** नातवंडांची वाट पाहात संध्याकाळीं पुलावर गप्पा मारीत दिवस काढायचे आतां.

[ तिघेही मावळत्या सूर्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहातात. ]

* * * *

[ संध्याकाळीं ७ वाजतां शंकराच्या देवळांत. ]

**यशोदाबाई :** श्रीशंकरा, मुलगा होऊं दे सुनबाईला. एक लक्ष बेल वाहीन मी !

**कस्तुरबाई :** खरंच ! मंदाला मुलगाच होईल. गणपति स्वप्नांत पाहिला काल रात्रीं मीं !

[ रात्रीं अकरा वाजतां पूर्ण चंद्रमा विलसत आहे. विजू व मनोहर गच्चीवर आहेत. ]

**मनोहर :** कसली आठवण होते पौर्णिमेचा चंद्र पाहिल्यावर तुला ?

**विजू :** तुम्हीं सांगा ना अधीं !

**मनोहर :** नाहीं ! आतां तुझी पाळी आहे पहिल्यानें सांगायची !

**विजु :** सांगू ?

**मनोहर :** हं !

**विजु :** तुमच्या आजोबानें मुंजींत आहेर दिलेल्या त्या चांदीच्या ताटलीची...

**मनोहर :** नाहीं ! नाहीं ! तीच ताटली उलटी करून त्यावर तुम्ही बायका पापड्या घालतां, त्या पापड्यांची !

[ मनोहर हसतो, विजू हसते, चंद्रही हसतो. ]

* * *

## न वीं प्र का श नें